# नवभारत

वर्ष ७ वें ) नोव्हेंबर १९५३ ( अंक २ रा


तत्त्वज्ञानाच्या अभ्यासांतील नवा कल . . . प्रा. दि. द. माहुलकर

आर्थिक नियोजन आणि पक्षपद्धति . . प्रा. राम जोशी

भूदानयज्ञ आणि आर्थिक क्रान्ति . . . श्री. ह. कृ. मोहनी

अन्नटंचाई व लोकसंख्येची वाढ . . . डॉ. रा. अ. करंदीकर

गुरु नानक . . . . . . . श्री. म. वि. भिडे

रशियांतील विरोधक-निःपाताच्या उपपत्ती . . प्रा. गोवर्धन पारीख

मद्रासची सांस्कृतिक-स्वातंत्र्य-परिषद् . . श्री. प्रभाकर पाध्ये

'माझे ज्यो काका' . . . . . . प्रा. व. म. परांजपे

आद्य भारतीय प्राच्यविद्यासंशोधक आचार्य बाळशास्त्री जांभेकर

प्रा. स. का. दीक्षित

स्त्रियांना मतदानाचा हक्क मिळवून देणाऱ्या मिसेस् पँकहर्स्ट

प्रा. मु. गो. देशपांडे

पुस्तकपरामर्श, कविता


किंमत १ रुपया




अनुक्रमणिका




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)








महाराष्ट्र शासन

मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**

**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**

संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष सातवें
अंक दुसरा

# नवभारत

नोव्हेंबर
१९५३

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर–आचार्य स. ज. भागवत–श्री. हरि कृष्ण मोहनी–प्रा. गोवर्धन पारीख
प्रा. वि. म. वेडेकर का. संपादक

| | | |
|---|---|---|
| तत्त्वज्ञानाच्या अभ्यासांतील नवा कल | प्रा. दिनेश द. माहुलकर | १– ४ |
| समानता | सुशीलाग्रज | ४ |
| अन्नटंचाई व लोकसंख्येच्या वाढीचा प्रश्न | डॉ. रा. अ. करंदीकर | ५–१४ |
| स्त्रियांना मतदानाचा हक्क मिळवून देणाऱ्या मिसेस् पँकहर्स्ट | प्रा. मु. गो. देशपांडे | १५–२० |
| हृन्मंदिर मंगलसें......! | प्रा. देवदत्त अ. दाभोलकर | २० |
| आर्थिक नियोजन आणि पक्षपद्धति | प्रा. राम जोशी | २१–२५ |
| आळंदींत ज्ञानेश्वरा —! | श्री. गणेश कुडे | २५ |
| ' माझे ज्यो काका ' | प्रा. व. म. परांजपे | २६–३२ |
| भूदानयज्ञ आणि आर्थिक क्रान्ति | श्री. ह. कृ. मोहनी | ३३–३८ |
| गुरु नानक | श्री. म. वि. भिडे | ३९–४३ |
| आद्य भारतीय प्राच्यविद्यासंशोधक आचार्य बाळशास्त्री जांभेकर | प्रा. स. का. दीक्षित | ४४–४९ |
| आवर हें दान--! | विंदा करंदीकर | ४९ |
| रशियांतील विरोधक-निःपाताच्या विविध उपपत्ती | प्रा. गोवर्धन पारीख | ५०–५८ |
| मद्रासची सांस्कृतिक-स्वातंत्र्य-परिषद् | श्री. प्रभाकर पाध्ये | ५९–६२ |
| पुस्तक-परामर्श | | ६३–६४ |

वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. वेडेकर यांनीं सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत मासिक' ९०६ शिवाजी-नगर, पुणें ४

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, ' नवभारत ' मासिक C/o प्राज्ञ प्रेस वाई ( जि. सातारा )

अनुक्रमणिका







# ‘नवभारत’ मासिक, नोव्हेंबर १९५३

## —लेखक-परिचय—

**प्रा. दिनेश द. माहुलकर**– बडोदें येथील ‘महाराज सयाजीराव विद्यापीठां’त इंग्रजीचे प्राध्यापक. ‘नवे पैलू’ ( गीतेची समीक्षा ) या पुस्तकाचे लेखक.

**डॉ. रा. अ. करंदीकर**– पलुस ( द. सातारा ) येथें वैद्यकीचा व्यवसाय.

**प्रा. मु. गो. देशपांडे**– नाशिक येथील हं. प्रा. ठा. कॉलेजमध्यें इंग्रजीचे प्राध्यापक.

**प्रा. राम जोशी**– मुंबई येथील रामनारायण रुईया कॉलेजमध्यें अर्थशास्त्राचे प्राध्यापक. मुंबई कार्पोरेशनचे प्रजासमाजवादी पक्षाचे सभासद.

**श्री. गणेश कुडे एम्. ए.**– अमळनेर येथील गं. स. हायस्कूलमध्यें शिक्षक.

**प्रा. व. म. परांजपे**– मुंबई येथील रामनारायण रुईया कॉलेजांत इंग्रजीचे प्राध्यापक.

**श्री. म. वि. भिडे** आय्. सी. एस्. ( सेवानिवृत्त )-( पुणें ).

**प्रा. स. का. दीक्षित** एम्. ए.– नागार्जुनकोंडा ( जि. गुंटुर ) येथील ‘आर्केऑलॉजिकल म्युझिअम’चे ‘कस्टोडिअन’. ‘Mother Goddess’ ‘सिंधु नदीवरील संस्कृति’ इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**श्री. प्रभाकर पाध्ये**( मुंबई )– सुप्रसिद्ध मराठी पत्रकार व साहित्यिक. ‘इंडिअन कमिटी फॉर कल्चरल फ्रीडम’ चे चिटणीस.

---

## ‘नवभारत’ मासिकाचा बदललेला पत्ता

**ऑक्टोबर १९५३ अंकापासून** ‘**नवभारत**’ मासिक **वांई** येथील ‘**प्राज्ञप्रेस**’ मध्यें छापलें जात आहे. व्यवस्थापकांच्या सोयीच्या दृष्टीनें ‘नवभारता’च्या व्यवस्थापकांची कचेरी **वांई** येथेंच सप्टेंबर १५ पासून सुरू झाली आहे. तरी यापुढें वर्गणीदार, एजंट वगैरे यांनीं व्यवस्थापकांशीं पत्रव्यवहार करावयाचा झाल्यास तो **व्यवस्थापक : ‘नवभारत’ मासिक C/O प्राज्ञ प्रेस; वांई, जि. उ. सातारा.** या पत्त्यावर करावा.

‘नवभारता’च्या **संपादकांची कचेरी पुणें येथेंच राहील.** संपादकांशीं पत्रव्यवहार “**वि. म. वेडेकर, कार्यकारी संपादक, ‘नवभारत,’ ९०६ शिवाजीनगर, पुणें ४**” या पत्त्यावर करावा.

---

प्रा. दिनेश द. माहुलकर

# तत्त्वज्ञानाच्या अभ्यासांतील नवा कल

## अध्यात्मवादाच्या खुळया समजुती

एक काळ असा होता कीं मनुष्याला शब्द ही एक दैवी गोष्ट वाटत होती. इजिप्तचे लोक ' खर्न ' म्हणजे शब्द या देवाची पूजा करीत. हिंदी तत्त्वज्ञानांत शब्द हें ब्रह्माचें स्वरूप आहे असें वारंवार म्हटलेलें आढळतें. शब्दाच्या या दैवी स्वरूपाच्या श्रद्धेवरच मंत्रांची रचना झाली. ऋषी आपल्या शब्दसामर्थ्यानें कोणाचेंहि भलेंबाईट करूं शकतात हा त्याकाळचा विश्वास होता. शरीरांत जसा आत्मा तसा शब्दांत अर्थ ( logos, idea, meaning ) हें दैवी तत्त्व आहे असें मानलें जाई. हें तत्त्व वास्तव जगापेक्षां निराळ्या उदात्त जगांतील आहे असें तत्कालीन मनुष्यांनीं कल्पिलें. याच श्रद्धेवर प्लेटोपासून आजपर्यंतच्या तत्त्वज्ञांचा अध्यात्मवाद आधारला गेला आहे.

शब्दांतील वा विश्वांतील तें दैवी तत्त्व असें आहे कीं तें शब्दांनीं वर्णन करतां येत नाहीं ( नेति नेति ), वाणी तिथें जाऊन हात हलवीत परत येते ( यतो वाचो निवर्तन्तेऽप्राप्य मनसा सह ) असें म्हणून पूर्वीच्या अध्यात्मवादानें मौन स्वीकारण्याचा आग्रह धरला. जें अगम्य आहे, अवर्णनीय आहे त्याच्याविषयीं मौन स्वीकारणें हा सरळ व प्रामाणिक मार्ग होता. पण लहान मुलाला स्वस्थ बसण्यास सांगितलें कीं जशी त्याची चळवळ अधिकच सुरूं होते त्याप्रमाणें तत्त्वज्ञांच्या जिभेला मौनाचें हाड खुपूं लागून त्यांची वटवट वाढूं लागली. ' तें जर अवर्णनीय आहे अशी श्रद्धा तुम्हांला वाटते तर त्याबद्दल तुम्ही एवढें बोलतां कशाला ?' या प्रश्नाला ' तें अवर्णनीय आहे हें सिद्ध करण्यासाठीं ! ' असें उत्तर अध्यात्मवादी मोठ्या अभिमानानें देतात. भाषेच्या लंगडेपणावरून ' तत् ' चें सामर्थ्य व श्रेष्ठत्व सिद्ध होतें या अध्यात्मवादाच्या खुळ्या समजुतीवर प्रतिपक्षीयांनी या शतकाच्या सुरुवातीस जोराचा हल्ला केला. त्यांच्या मतें अध्यात्मवाद ही एक प्रकारची भाषिक हुलकावणी आहे. "तें जें कांहीं आहे त्याच्याकडे वाणीनें धांव घ्यावी, तें वर्णन करतां येत नाहीं म्हणून परत उलटावें व साऱ्या वास्तवाला 'माया' 'माया' म्हणून शब्दांच्या चाबकानें झोडपावें यापलीकडे ' तत्–त्व ' जाणूं पाहणाऱ्या अध्यात्मवादानें काय केलें आहे ?" असा खडा सवाल त्यांनीं टाकला.

अध्यात्मवादावरील या आरोपानें तत्त्वज्ञांचें लक्ष ' तत् ' वरून उडून भाषेच्या साधनावर बसलें. सुरीनें पाणी कापता येत नाहीं म्हणून पाणी अविभाज्य आहे असें म्हणण्यापूर्वी सुरी हें साधन पाणी विभागण्यास योग्य आहे का हें तपासायला हवें. भाषेचेंही असेंच आहे. आपल्याला ज्याच्याविषयीं कांहीं सांगायचें आहे त्याच्याविषयीं आपण भाषेच्या द्वारा कितीसें सांगूं शकतों हें शोधलें पाहिजे. 'तत्–त्व' जाणण्याच्या खऱ्याखुऱ्या निष्ठेनें प्रेरित झालेल्या परंतु भाषेतील आभासांना बळी न पडणाऱ्या विट्गेनस्टेइन याचा १९१८ सालीं प्रसिद्ध झालेला Tractatus Logico-Philosophicus हा ग्रंथ या दृष्टीनें आधुनिक तत्त्वज्ञानांतील फार महत्त्वाचा टप्पा आहे. ' ज्याच्याविषयीं कांहींच बोलतां येत नाहीं त्याविषयीं आपण मौनच स्वीकारलें पाहिजे ' असा विट्गेनस्टेइननें आपल्या ग्रंथाच्या शेवटीं निष्कर्ष काढून भाषेशीं लटपट करून ' तत् ' सिद्ध करण्याच्या प्रयत्नाला मुळापासून उखडून टाकलें.

## श्रद्धा व बुद्धि यांचीं क्षेत्रें भिन्न

अध्यात्मवादाविरुद्ध ही जी मतप्रणाली युरोपांत प्रगट झाली तिचा उद्देश अध्यात्मवादाच्या श्रद्धेवर टीका करण्याचा नसून श्रद्धेनें मानलेल्या गोष्टी तर्कानें समजविण्याच्या खटाटोपाविरुद्ध होता हें लक्षांत ठेविलें पाहिजे. जीवनाला आध्यात्मिक बैठक असायला पाहिजे, प्रेम, सहिष्णुता वगैरे नैतिक तत्त्वें श्रेष्ठ आहेत, धर्माचरणानें मानसिक शांति मिळते–वगैरे गोष्टी खोट्या आहेत असें या मतप्रणालीनें कधींहि सांगितलें नाहीं. रसेलचीं सामाजिक








विषयांवरील पुस्तकें नैतिक विचारांनीं परिपूर्ण आहेत; व्हाइट्हेडचे आध्यात्मिक विचार सर्वांच्या परिचयाचे आहेत; विट्गेनस्टेइन हा तर पुढेंपुढें गूढवादी बनला असें म्हणतात. अध्यात्मवादाविरुद्ध बोलणाऱ्या तत्त्वज्ञांच्या जीवनांतील या गोष्टी लक्षांत घेतल्या तर त्यांच्या टीकेचा रोख कशावर होता तें स्पष्ट होईल. मध्ययुगीन काळापासून श्रद्धेनें मानल्या गेलेल्या गोष्टींना बुद्धीचा व तर्काचा पाया आहे असा जो अध्यात्मवादानें हट्ट धरला होता तो हट्ट किती व्यर्थ आहे हें, त्या भाषेची तार्किक विसंगति प्रगट करून, दाखविण्याचें कार्य या नव्या मतप्रणालीनें केलें. गीतेंतील ' जातस्य हि ध्रुवो मृत्युः ध्रुवं जन्म मृतस्य च ' या प्रसिद्ध वचनांतील, पहिल्या विधानाचा तार्किक पाया व दुसऱ्या विधानाचा श्रद्धात्मक पाया, यांची गल्लत हें आपल्याकडील या बाबतींतलें सोपें उदाहरण आहे.

या संघर्षांतून निर्माण झालेलें मुख्य तत्त्व म्हणजे श्रद्धेनें बुद्धीचे व बुद्धीनें श्रद्धेचे प्रश्न सोडविण्याचा हव्यास धरूं नये हें होय. श्रद्धा व बुद्धि यांचीं क्षेत्रें, त्यांचे प्रश्न व त्यांच्या पद्धती वेगवेगळ्या आहेत हा विचार रसेलच्या लेखनांत प्रामुख्यानें आढळतो. [1] सी. डी. ब्रॉड् यानें आपल्या Scientific Thought या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत हा विचार विस्तारानें मांडला आहे. बुद्धिप्रमाण तत्त्वज्ञानाचें स्वरूप समजावून दिल्यानंतर ब्रॉड् लिहितो:

" आतां दुसऱ्या एका प्रकारचें तत्त्वज्ञान आहे; आणि, तें अधिक उत्तेजक असल्यानें, सामान्य माणूस तत्त्वज्ञान या नांवानें त्यालाच ओळखतो. या तत्त्वज्ञानाला मी श्रद्धाप्रमाण तत्त्वज्ञान हें नांव देतों. बुद्धिप्रमाण तत्त्वज्ञानापेक्षां याचा उद्देश निराळा आहे. त्याची पद्धति निराळी आहे, आणि त्यांतून निघणाऱ्या सिद्धान्तांमध्यें निश्चिततेचें प्रमाणहि सारखें नसतें. या श्रद्धाप्रमाण तत्त्वज्ञानाच्या सिद्धान्तांना दैनंदिन जीवनांत विशेष महत्त्व असल्यानें जुन्या काळांतील लोक याच तत्त्वज्ञानाकडे धांव घेत. याचा परिणाम असा झाला कीं या तत्त्वज्ञानाच्या विशाल मीमांसा रचल्या गेल्या. पण अगदीं न्यायबुद्धीनें म्हणायचें झालें तर या मीमांसा म्हणजे केवळ चंद्रप्रकाश, अर्थशून्य गोष्टी होत्या ... फार फार तर या तत्त्वज्ञानांत अगदीं क्षुल्लक आधारावर मांडलेल्या कांहीं सवंग कल्पना असूं शकतील. पण बुद्धिप्रमाण तत्त्वज्ञान जसें कांहीं निश्चित सिद्धान्त रचतें तसे सिद्धान्त या तत्त्वज्ञानाच्या हातीं लागण्याची आशा नाहीं ... आपल्या आशा आणि भीति, आपल्या आवडीनिवडी, आपल्या मूल्यांच्या कल्पना यांच्या अनुरोधानें माणसाचा विश्वासंबंधींचा, स्वतःसंबंधींचा व समाजासंबंधींचा विचार पुष्कळसा बदलत जाण्याचा संभव असतो. इतकेंच काय, आपली शरीरप्रकृति व बँकेंतील आपली ठेव यांवरही श्रद्धाप्रमाण तत्त्वज्ञान फार अंशीं अवलंबून आहे. " [2]

---

1 Mysticism and Logic, p. 107–9 .

2 " Now there is another kind of Philosophy; and, as this is more exciting, it is what laymen generally understand by the name. This is what I call *Speculative Philosophy*. It has a different object, is pursued by a different method, and leads to results of different degree of certainty from Critical Philosophy......In the past people have tended to rush on to Speculative Philosophy, because of its greater practical interest. The result has been the production of elaborate systems which may quite fairly be described as moonshine... At the best Speculative Philosophy can only consist of more or less happy guesses, made on a very slender basis. There is no hope of its reaching the certainty which some parts of Critical Philosophy might quite well attain... A man's final view of the universe as a whole, and of the position and prospects of himself and his fellows, is

ब्रॉड्च्या मनांत श्रद्धेचा धिक्कार करण्याचा उद्देश नाहीं; त्याला फक्त इतकेंच सांगायचें आहे कीं श्रद्धेचे कितीतरी प्रश्न बुद्धीनें हाताळण्याचा आभास तत्त्वज्ञांनीं निर्माण केल्यामुळें तत्त्वज्ञानाच्या अभ्यासांत एक प्रकारचा बौद्धिक अप्रामाणिकपणा शिरला आहे. या अप्रामाणिकपणाचें उच्चाटन करण्याचा पहिला मार्ग श्रद्धाप्रमाण व बुद्धिप्रमाण असे तत्त्वज्ञानाचे दोन प्रकार मानणें हा होय.

ब्रॉड्चा Scientific Thought हा ग्रंथ ज्या वर्षी प्रसिद्ध झाला त्याच वर्षभरांत सी. के. ऑग्डेन् व आय्. ए. रिचर्ड्स हे आपल्या "The Meaning of Meaning" या ग्रंथांतील सिद्धान्तांचा पुरस्कार करीत होते. मध्ययुगीन काळांतील श्रद्धावादाला विरोध करणाऱ्या विल्यम् ऑफ् ऑकॅम्नें असें मत मांडलें होतें कीं भाषेंतील शब्द हीं ध्वनींनीं बनलेलीं नांवें आहेत. या शब्दांनीं आपण आपल्या विचारांची दिशा सूचित करतों. परंतु भाषेंत शब्द निर्माण झाला कीं विश्वांत त्यानें सूचित केलेली गोष्ट निर्माण झाली आहे असें मानून तत्त्वज्ञांनीं आत्मा, ईश्वर इत्यादि गोष्टींच्या स्वरूपावर उगीच वादविवाद केले आहेत. शब्द हीं केवळ नांवें आहेत. यामुळें विश्वाचें खरेंखुरें ज्ञान शाब्दिक तर्काचे देव्हारे रचून मिळण्यापेक्षां तें विश्वांतील वस्तूंना प्रत्यक्ष हाताळून, प्रयोग करून मिळेल असें ऑकॅम्चें सांगणें होतें. ज्या काळांत उष्णता दिली कीं कोंबडीचें अंडें कठीण होतें हें सांगण्यासाठीं ॲरिस्टॉट्लचा आधार द्यावा लागत होता त्या काळांत ऑकॅम्ला हे विचार सुचले यावरून त्याचें श्रेष्ठत्व ध्यानांत येईल. ऑकॅम्च्या या शब्दनामवादा-(Nominalism) चा आधुनिक अवतार म्हणजे ऑग्डेन व रिचर्ड्स यांचा The Meaning of Meaning हा ग्रंथ होय.

## भाषेचा द्विविध वापर

सत्य, सौंदर्य, मन इत्यादि शब्दांच्या वेगवेगळ्या व्याख्या तत्त्वज्ञांनीं केल्या आहेत. याचें कारण अर्थ या मूलभूत गोष्टीचा कोणीही शास्त्रशुद्ध विचार केलेला नाहीं. म्हणून अर्थाचा अर्थ काय हें स्पष्टपणें समजल्याशिवाय कोणत्याही शब्दाची व्याख्या करता येणें शक्य नाहीं अशी ऑग्डेन व रिचर्ड्स यांची भूमिका आहे. भाषा हें एक माध्यम आहे व तें दोन प्रकारें वापरलें जातें. ज्यावेळीं एकाद्या शब्दानें आपण एकाद्या वस्तूचा (उदा०, 'टेबल' या शब्दानें टेबल या वस्तूचा) निर्देश करतों त्यावेळीं भाषा निर्देशात्मक रीतीनें (symbolically) वापरली जाते. ज्यावेळीं एकाद्या शब्दानें (उदा०, 'चांगलें,' 'सुंदर,' इ० शब्दांनीं) आपण आपल्यांतील किंवा दुसऱ्यांतील भावना उद्दीपित करतों त्यावेळीं भाषा उद्दीपक रीतीनें (evocatively) वापरली जाते. भाषेच्या या दोन्ही रीती सळमिसळीनें वापरल्या जात असल्यानें शब्दांच्या व्याख्येसंबंधीं आपला घोंटाळा उडतो. एकाद्या शब्दाचा अथवा वाक्याचा अर्थ समजण्यासाठीं भाषा कोणत्या प्रकारें वापरली गेली आहे हें तपासणें महत्त्वाचें आहे.

ऑग्डेन व रिचर्ड्स यांच्या या सिद्धान्ताला तत्त्वज्ञानाच्या अभ्यासांत फार महत्त्वाचें स्थान द्यावें लागेल. मध्ययुगीन काळापासून तत्त्वज्ञान हें श्रद्धाप्रमाण गोष्टींनीं भरलेलें आहे व असल्या गोष्टी सिद्ध करण्यासाठीं तत्त्वज्ञांनीं भाषेचा उद्दीपक रीतीनें उपयोग केला आहे. अशा भाषेला बौद्धिकतेची (किंवा निर्देशात्मक रीतीनें वापरल्या जाणाऱ्या भाषेची) कसोटी लावून अध्यात्मवादानें 'तत्' हें अगम्य आहे व विश्व ही माया आहे हा निष्कर्ष काढला. आधुनिक तत्त्वज्ञाला या सिद्धान्ताचा विचार करण्याची जरूरी नाहीं. 'तत्' च्या अगम्यत्वाबद्दल त्याला उदासीनता वाटत असून विश्वाचें स्वरूप जाणणें हेंच तत्त्वज्ञानाचें कार्य आहे अशी त्याला खात्री वाटते.

हें विश्वाचें स्वरूप जाणण्यासाठीं तत्त्वज्ञानाला भाषिक लटपट सोडून देऊन नवे प्रश्न हाताळावे लागणार. हे नवे प्रश्न कोठून येणार ? आजपर्यंत ज्या तत्त्वज्ञांना

---

peculiarly liable to be biased by his hopes and fears, his likes and dislikes, and his judgments of value. One's Speculative Philosophy tends to be influenced to an altogether undue extent by the state of one's liver and the amount of one's bank-balance." (p. 20-1).

तत्त्वज्ञान हें स्वायत्त आहे असें वाटत आलें आहे त्यांना तत्त्वज्ञानाचे प्रश्न हे विज्ञानांतून येणार असें सांगितलेलें रुचणार नाहीं. पण तत्त्वज्ञानाच्या इतिहासाकडे पाहिलें असतां असें आढळून येईल कीं ग्रीक संस्कृतींतील प्लेटोचें तत्त्वज्ञान व युरोपांतील कान्ट्चें तत्त्वज्ञान यांतील पुष्कळ प्रश्न तत्कालीन विज्ञान व गणित यांतून आले आहेत. आजही तत्त्वज्ञानाला केवळ विद्यापीठांतील पोपटपंची व परीक्षांच्या प्रश्नपत्रिका यांच्यापुरतें मर्यादित ठेवायचें नसेल तर त्याचा विज्ञान व गणित या आजच्या संस्कृतींतील दोन अत्यंत प्रगत ज्ञानशाखांशीं समन्वय साधला पाहिजे.

## विज्ञानाच्या प्रगतीचें रहस्य

आजचें विज्ञान हें मध्ययुगीन काळांतील श्रद्धावादाला व भाषिक तर्कशास्त्राला विरोधक म्हणून प्रथम उदयास आलें. विज्ञानाच्या गेल्या चार शतकांतील प्रगतीकडे पाहतां तत्त्वज्ञानाला आपली प्रगति कां साधतां येऊं नये याचें कारण सहज समजेल. विज्ञान हें वस्तुमात्रांवर प्रयोग करतें म्हणूनच केवळ त्याची प्रगति झाली असें नाहीं. विज्ञान हें तत्त्वज्ञानाइतकेंच वैचारिक क्षेत्रांत संचरतें हें न्यूटन व आइन्स्टीनच्या ग्रंथांवरून स्पष्ट होईल. विज्ञानांतहि तत्त्वज्ञानाप्रमाणें गृहीततत्त्वें आहेत. मग विज्ञानाची प्रगति कां झाली ? विज्ञानाच्या प्रगतीचें खरें रहस्य कशांत असेल तर तें त्याच्या विश्वासंबंधीच्या मूलभूत भूमिकेंत. तत्त्वज्ञानानें ज्याप्रमाणें ' तत् ' हें अगम्य मानलें त्याप्रमाणें विज्ञानानें मानलें नाहीं. पाणी हें दोन भाग हायड्रोजन व एक भाग ऑक्सिजन या वायूंचें बनलेलें आहे, हायड्रोजनचा अणू अमुक इतक्या परमाणूंचा बनलेला आहे, हे परमाणू अमुक एका रचनेनें बांधलेले आहेत इत्यादि सिद्धान्त, विश्वांतील 'तत्' गम्य मानल्यामुळेंच, वैज्ञानिक रचूं शकला. या सिद्धान्तांनीं वैज्ञानिकाचें जसें समाधान होतें तसें तत्त्वज्ञाचें होत नाहीं. तत्त्वज्ञाच्या या असमाधानी मनोवृत्तीचें रहस्य हें कीं त्यानें प्रथमपासून मनाची अशी भूमिका करून ठेवली आहे कीं त्या मनाला कांहींहि पटविण्याचा प्रयत्न केला तरी तें त्यापलीकडे कांहींतरी रहस्य आहे असें मानतें. एकाद्या गोष्टीकडे ' आश्चर्यवत् ' पाहणें हें भावनेचें लक्षण आहे व कवि होऊं इच्छिणाऱ्यानें अशी भावना सदैव जागृत ठेवणारें मन स्वतःमध्यें निर्माण करणें अगत्याचें आहे. परंतु तत्त्वज्ञांनीं ही भावना मनांत ठेवून 'तत्' हें अगम्यच आहे हा जो अगम्यगतिकत्वाचा आभास [३] निर्माण करून ठेवला त्यानेंच त्यांची प्रगति होऊं शकली नाहीं. आपण हें समजूं व समजावूं शकूं या विश्वासानेंच गणितानें व विज्ञानानें कॅल्क्युलस् आणि लहरींचा सिद्धान्त रचले ना ? याच दृष्टीनें लहरींचा सिद्धान्त रचणाऱ्या एरविन् श्रडिंगर-( Shrodinger )नें विट्गेनस्टेइन्च्या मौनासंबंधीच्या सूत्रावर भाष्य केलें आहे कीं, ' जिथें बोलतां येत नाहीं तिथें बोलणें हेंच तर मुळीं गंमतीचें आहे. ' विज्ञानाच्या साऱ्या प्रगतीचें रहस्य श्रडिंगरच्या या वाक्यांत प्रतीत केलें गेलें आहे !

३ या प्रकाराला उपमा द्यायची झाली तर ग्रीक तत्त्वज्ञानांत झेनो ( Zeno ) यानें निर्माण केलेल्या ' अखिलिज् व कांसव ' या कूटप्रश्नाची उपमा द्यायला हरकत नाहीं.

## समानता

समान सागर, लहरी सुंदर
लाटा उठतां परि त्या वरवर
तुफान होई फार भयंकर
पुन्हां शांत हो, थांबे सागर
दाब हवेचा कुठें वाढला
आणि कमी तो कुठें जाहला
वावटळीचें चक्र फिरें मग
समानतेस्तव जग करि तगमग
जलबिंदू सिंधुंतून उठला
मेघ बनुनि तो गगनीं फिरला
दिमाख दावी परंतु क्षणभर
पहा झिरपतो खालीं झरझर
समानता नच जिथें राहिली
तेथें तेथें क्रांति जाहली
माजे वादळ कुठें तुफानहि
नाश जगाचा करुं मग पाही
आम्ही परंतु दुर्बल नर ते
दुर्बलता नसनसांत डसते
कुणी हवेलींत ! झोपडींत कुणि !
कुणि राजा हो ! भिकारी कुणी !

— सुशीलाग्रज







डॉ. कॅस्ट्रो यांचा नवीन दृष्टिकोण : श्री. रा. अ. करंदीकर

# अन्न-टंचाई व लोकसंख्येच्या वाढीचा प्रश्न

अलीकडे 'कुटुंब-नियोजन' हा विषय प्रत्येक व्यक्तीचा जिव्हाळयाचा विषय होऊं लागला आहे. हिंदुस्थानांतील शेतीचें उत्पादन व लोकसंख्येंतील वाढ यामध्यें गेलीं कित्येक वर्षें वाढती तफावत दिसून येते. या परिस्थितींत फाळणीमुळें भरच पडल्यानें अन्नाचा प्रश्न आपल्याकडे अत्यंत बिकट होउन बसला. लोकसंख्येंतील वाढ कशी थोपवून धरावयाची व या वाढत्या लोकसंख्येला पुरण्याइतकें अन्न कोठून आणावयाचें या दोन प्रश्नांनीं आपल्या सरकारचें लक्ष वेधून घेतलें आहे. आपल्या सरकारनें राष्ट्रीय पुनर्रचनेचा एक कार्यक्रम तयार करून वरील दोन प्रश्न सोडविण्याच्या दृष्टीनें पाऊल उचललें आहे. व त्या कार्यक्रमांतीलच एक भाग म्हणून कुटुंबनियोजनाचा प्रसार खूप मोठ्या प्रमाणावर करण्यांत येत आहे. हिंदुस्थानांत सध्यां लोकसंख्येची भरमसाट वाढ होत आहे व लोकसंख्येच्या मानानें जमिनीच्या क्षेत्रांत किंवा उत्पादनक्षमतेमध्यें वाढ होत नसल्यानें या वाढत्या लोकसंख्येला पोसण्यासाठीं अन्न कोठून आणावयाचें हा प्रश्न तीव्रतेनें आपल्यापुढें उभा आहे. यासाठीं लोकसंख्येच्या वाढीस आळा घातलाच पाहिजे व कुटुंबनियोजन म्हणजेच संततिनियमन करून लोकसंख्येंतील वाढ थांबवितां येईल असें मत त्या परिषदेमध्यें पुढें मांडण्यात आलें. लोकसंख्येच्या वाढीमुळें अन्नाची कमतरता निर्माण होते असा सिद्धांत वरील प्रचारांत गृहीतच धरण्यांत आलेला आहे.

या उलट " वरील प्रचार हा वस्तुस्थितीला सोडून होत असून, लोकसंख्येच्या वाढीमुळें अन्नाची कमतरता निर्माण होत नाहीं तर अन्नाच्या कमतरतेमुळेंच—दुर्भिक्षतेमुळेंच लोकसंख्येंत वाढ होत असते. लोकसंख्येंतील वाढ थोपवून धरावयाची असेल तर अन्नाचें उत्पादन अनेक पटींनीं वाढवून लोकांना भरपूर व सकस अन्न खाण्यास मिळालें पाहिजे तरच लोकसंख्येंतील वाढ थांबविता येईल " असें एक नवें मत आज पुढें येत आहे. प्रथमविचारांतीं वरील मत पोकळ वाटतें पण डॉ. जोसू द कॅस्ट्रो यांनीं आपल्या ' उपासमारीचा भूगोल ' – ' Geography of Hunger ' या पुस्तकांत शास्त्रीय दृष्ट्या, अनेक पुराव्यानिशीं आपलें म्हणणें सिद्ध केलें आहे.

जगांतील वाढत्या लोकसंख्येमुळें अन्नाची कमतरता निर्माण होत नसून उलट अन्नाच्या कमतरतेमुळें लोकसंख्या वाढत आहे. त्यांस आळा घालावयाचा असेल तर आपल्यावर जबाबदारी येते कीं प्रत्येक व्यक्तीस भरपूर व सकस अन्न खाण्यास मिळालें पाहिजे. सकस अन्न विशेषतः भरपूर दूध, मांस, अंडीं हीं जर व्यक्तीच्या खाण्यांत आलीं तर त्याचा परिणाम त्या व्यक्तीच्या प्रजोत्पादनक्षमतेवर होऊन आपोआपच लोकसंख्येस आळा बसेल. तेव्हां मुख्य प्रश्न अन्नाची तूट हा नसून अन्नाची समृद्धि कशी होईल हा आहे, असा डॉ. द कॅस्ट्रो यांचा लोकसंख्येच्या वाढी संबंधींचा सिद्धांत आहे. डॉ. कॅस्ट्रो यांनीं आपल्या पुस्तकाचे दोन भाग केले आहेत. पहिल्या भागांत त्यांनीं आपल्या मतासंबंधींचें शास्त्रीय विवेचन केलें आहे व दुसऱ्या भागांत वरील शास्त्रीय विवेचनास आधारभूत अशी प्रत्येक देशांतील अन्नपरिस्थितीसंबंधींची ऐतिहासिक माहिती भरपूर पुराव्यानिशीं त्यांनीं मांडली आहे. शेवटच्या दोन प्रकरणांमध्यें वाचकाच्या मनांत

डॉ. जोसू द कॅस्ट्रो हे एक प्रख्यात वनस्पतिशास्त्रज्ञ असून ब्राझिलमधील आहारविषयक संशोधनसंस्थेचे Nutritional Institute चे प्रमुख आहेत. युनोच्या F. A. O. चे अन्न व शेतीविषयक संस्थेच्या कार्यकारी मंडळाचे ते कार्याध्यक्ष आहेत. त्यांनीं लिहिलेल्या ' Geography of Hunger ' या पुस्तकाचा परिचयपरामर्श प्रस्तुत लेखांत करून दिला आहे.

त्यांनीं असा विश्वास निर्माण केला आहे कीं शास्त्रीय शोधांच्या साहाय्यानें निसर्गावर पूर्ण विजय मिळवून मानव जगांमधून 'उपासमारी'ची कायमची हाकालपट्टी करील.

भूक (Hunger) हा शब्द अनेक अर्थीं वापरण्यांत येतो. आपल्या पुस्तकांत कोणत्या अर्थानें त्याचा वापर केला आहे हें डॉ. कॅस्ट्रो यांनीं पुढील शब्दांत सांगितलें आहे : "प्रचंड मानवसमुदायास सतत पीडणारा असा जो उपासमारीचा किंवा अन्नाच्या कमतरतेचा प्रश्न आहे, जो बहुसंख्य देशांत कायमचाच आहे किंवा मधूनच अत्यंत तीव्र स्वरूपांत ( epidemic ) आपल्या समोर उभा राहतो, अशा सामुदायिक उपासमारी- (Collective Hunger च्या प्रश्नाचें पृथक्करण करण्याचा माझा उद्देश आहे. संपूर्ण उपासमारीबद्दलच किंवा (famine) दुष्काळाबद्दलच तेवढी चर्चा येथें मी करीन असें नाहीं तर उपासमारीचें जें सर्वसाधारण स्वरूप आपल्या पहाण्यांत येतें व जें संख्येच्या दृष्टीनें पाहूं गेल्यास भयंकर आहे असें जें उपासमारीचें लपलेलें किंवा लपवून ठेवण्यांत आलेलें स्वरूप आहे त्या संबंधींहि मी येथें चर्चा करणार आहे. कारण उपासमारीचें जें दृष्टीआडचें स्वरूप असतें तें कांहीं आवश्यक अशा पोषक द्रव्यांच्या कायमच्या कमतरतेमुळें निर्माण झालेलें असतें. अन् त्यामुळें लोक दररोज जरी खातपीत असले तरी कणाकणानें या गुप्त उपासमारीस ते बळी पडत असतात." ( पान २९ ). जगामधील सार्वत्रिक उपासमारीचीं दोन कारणें नेहमीं पुढें मांडण्यांत येतात. एक मत असें सांगतें कीं दुष्काळ हे कधीं न संपणारे व नैसर्गिकच आहेत. याउलट, जगांतील लोकसंख्येच्या वाढीवर सक्तीनें बंधन घातलें, तरच आपण उपासमार थांबवूं शकूं असें दुसरें मत आहे. डॉ. कॅस्ट्रो म्हणतात कीं मानवजातीच्या भविष्याच्या दृष्टीनें हीं दोन्हीं मतें महाभयंकर आहेत. कारण उपासमारीच्या प्रश्नाचें जें सामाजिक वास्तवस्वरूप आहे त्याचा विपर्यासच वरील दोन्ही दृष्टिकोन करीत असतात. जगामध्यें आज जेवढी जमीन लागवडीखालीं आहे किंवा येण्यासारखी आहे, तेवढी जमीन जगांतील आजच्या लोकसंख्येस भरपूर अन्न पुरवूं शकेल. दुष्काळ हे निसर्गनियमानेंच येतात हें किती खोटें आहे हें पुढील आंकडेवारीवरून कळून येतें : पृथ्वीचा जो परिघ आहे त्याचा ७१ टक्के भाग पाण्यानें व्यापला आहे. उरलेला २९ टक्के भाग जमीन आहे. हा २९ टक्के भाग एकंदर ५६ दशलक्ष चौरस मैल भरतो. यांतील ३० टक्के भाग जंगलांनीं व्यापलेला आहे, २० टक्के भाग गवताळ आहे, ३२ टक्के वाळवंट आहे व उरलेले १८ टक्के डोंगराळ आहे. शास्त्रज्ञांचें असें मत आहे कीं पृथ्वीवरील सुमारें निम्मी म्हणजे २५ दशलक्ष चौरस मैल जमीन लागवडीखालीं आणतां येईल. वाळवंट. व डोंगराळ भाग यांतून वगळला तरी मानवाच्या वांट्यास १६ सहस्र लक्ष एकर जमीन येते. म्हणजे जगाच्या आजच्या लोकसंख्येप्रमाणें प्रत्येकाच्या वांट्यास ८ एकर जमीन येते. शेतीशास्त्रज्ञांचा दावा असा आहे कीं २ एकर जमीनीमधून प्रत्येक व्यक्ति स्वतःस आवश्यक असें भरपूर अन्न निर्माण करूं शकते. दोन एकरांप्रमाणें जमीन वांटण्यांत आली तर जगांतील लागवडीखालीं येणाऱ्या जमिनीपैकीं $\frac{1}{4}$ जमीनच वांटली जाईल. परंतु आजची परिस्थिति अशी आहे कीं $\frac{7}{8}$ जमीनदेखील लागवडीखालीं अद्याप आलेली नाहीं. तेव्हां ही सारी जमीन लागवडीखालीं आणली तर त्यांतून एवढें प्रचंड अन्नोत्पादन होईल कीं निसर्गनियमानेंच दुष्काळ येत असतात हें म्हणणें खोटें ठरेल ! शिवाय डॉ. कस्ट्रो यांचें म्हणणें आहे कीं पृथ्वीवरील लागवडीखालीं येणाऱ्या जमीनीची शास्त्रीय दृष्ट्या मशागत करण्यांत आली तर त्यांतून निर्माण होणाऱ्या अन्नावर आजच्यापेक्षां पांचपट अधिक लोकसंख्या पोसली जाईल ! लोकसंख्येच्या वाढीवर सक्तीनें बंधनें घालावीं अशा मताचे लोक माल्थसच्या सिद्धांताचा आधार घेत असतात. माल्थसचे सिद्धांतहि अशास्त्रीय आहेत असें डॉ. कॅस्ट्रो यांचें मत आहे. त्यांच्या मतें माल्थसची प्रमुख चूक अशी कीं–लोकसंख्येच्या वाढीचा अन् लोकांच्या भोंवतालच्या परिसराचा म्हणजेच राजकीय, सामाजिक नि आर्थिक परिस्थितीचा कांहीं संबंध असत नाहीं असे तो सांगत असें. माल्थसचे सिद्धान्त इतिहासानेंच खोटे ठरविले आहेत. अलीकडे परत माल्थसच्या सिद्धांतांना उजळा देऊन परत नव्या स्वरूपांत ते पुढें येत आहेत. त्याचें कारण काय ? दुसऱ्या महायुद्धांत जी प्रचंड प्राणहानि व वित्तहानि झाली त्यामुळें निर्माण झालेल्या अस्थिर आर्थिक परि-

स्थितीमुळें सामान्य माणूस भविष्यकालाबद्दल नेहमीं साशंकच असतो. सध्यां अन्नाच्या टंचाईचा प्रश्न जगभर निर्माण झाला आहे. विशेषतः जे देश पूर्वी साम्राज्यवाद्यांच्या वसाहती होत्या अशा मागासलेल्या ( हिंदुस्थान वगैरे ) देशांत जमीनीच्या उत्पादनांत घट निर्माण झाल्याकारणानें तेथील सामान्य व्यक्तीचें जीवन अगदीं अस्थिर झालें आहे. लोकांना जीविताची शाश्वती वाटत नाहीं. अशा लोकांपुढें, लोकसंख्या कमी केली नाहीं तर अन्नटंचाई कमी व्हावयाची नाहीं व मग एके दिवशीं साऱ्या जगावरच दुष्काळास बळी पडण्याची पाळी येईल, अशा तऱ्हेचें भीतिदायक चित्र रंगविण्यांत येतें. अमेरिकन लेखक वुईल्यम व्होग्ट यांच्याकडे या प्रचाराचें पुढारीपण आहे. अमेरिकन साम्राज्यवाद्यांचे हितसंबंध त्यामागें दडलेले असतात. मागासलेल्या देशांतील जमीन-मालकी हक्कांमध्यें क्रांतिकारक बदल घडवून आणले व नव्या शास्त्रीय पद्धतीनें तेथील शेती कसण्यांत आली तर अन्नटंचाई दूर होण्यास खात्रीनेंच मदत होईल. पण नेमकी हीच गोष्ट साम्राज्यवाद्यांना आवडत नाहीं. कारण त्यांना अशी भीति वाटते कीं मागासलेल्या देशांतील लोकांचें जीवनमान सुधारलें तर त्यांच्या हातांतील एक मोठी बाजारपेठ नष्ट होईल. आपल्या पुस्तकांत व्होग्ट यांचीं मतें, शास्त्रीय पुरावे पुढें मांडून डॉ. कॅस्ट्रो यांनीं खोडून काढलीं आहेत. जमीनीच्या मालकी हक्कांमध्यें क्रांतिकारक बदल घडवून आणून, नव्या शास्त्रीय ज्ञानाचा आधार घेउन शेतीची मशागत केली पाहिजे याच मताचा पुरस्कार डॉ. कॅस्ट्रो यांनीं आपल्या पुस्तकांत केला आहे.

लोकसंख्येच्या वाढीस आळा घातला पाहिजे असें म्हणणाऱ्यांचा दुसरा एक मुद्दा असतो कीं सध्यां जमीनींतून उत्पादन काढण्याची कमाल मर्यादा गांठण्यांत आली आहे व त्याबरोबरच लोकसंख्येच्या वाढीच्याहि कमाल मर्यादा गांठल्या आहेत. हें मतहि खोटें आहे असें डॉ. कॅस्ट्रो म्हणतात. त्यांचें म्हणणें असें कीं, जगांतील लागवडीखालीं येऊं शकणाऱ्या ५० टक्के जमीनीपैकीं १० टक्के जमीनच सध्यां कसली जाते. तेव्हां लागवडीखालीं येऊं शकणाऱ्या जमीनीच्या क्षेत्रफळामध्यें वाढ केली तर जास्त धान्य निर्माण होऊं शकेल. शिवाय सध्यां दर एकरी जें उत्पादन होतें त्यामध्यें नवीन शास्त्रीय पद्धतीनें किती तरी वाढ होऊं शकेल. जागतिक अन्नोत्पादनासंबंधीं युनोच्या अन्न व शेती-विषयक कमिटीनें जो रिपोर्ट प्रसिद्ध केला आहे त्यामध्यें म्हटलें आहे कीं हिंदुस्थानांतील गव्हाच्या उत्पादनांत पुढील १० वर्षांत ३० टक्क्यांनीं वाढ होण्याची शक्यता आहे. आणि पुढें त्यामध्येंच म्हटलें आहे कीं दहा वर्षांच्या मशागतीनंतर आणखी जास्त काळजी घेतली तर उत्पादनाचें मान ५० टक्क्यापर्यंत देखील वाढूं शकेल. डॉ. द कॅस्ट्रोंनीं ज्या अपेक्षा प्रदर्शित केल्या आहेत त्या प्रत्यक्षांत आणून दाखविण्याचें कार्य सोव्हिएट युनियन व नव लोकशाही राष्ट्रांनीं केलें आहे. चीनमधील शेतीच्या उत्पादनाचे गेल्या तीन वर्षांतील आंकडे पाहिले तर तेथील अन्नपरिस्थिति किती झपाट्यानें बदलत आहे हें दिसून येतें. चीनमध्यें "जमीन ही माणसाची गुलाम नसून माणूसच जमीनीचा गुलाम आहे" अशा अर्थाचे उद्गार पूर्वी एकेकाळीं एका अमेरिकन लेखकानें काढले होते. पण पंचेचाळीस कोटींच्या मुखांत अन्न कोंबून घालावयाचें हा आज चीनपुढें प्रश्न नाहीं तर स्वतःच्या पंचेचाळीस कोटींना पोटभर अन्न देऊन, दुसऱ्या गरजू राष्ट्रांना धान्य पुरविण्याची ताकद आज चीननें कमावली आहे.

अन्नधान्याची टंचाई किंवा त्यामुळें निर्माण होणारी उपासमार व लोकसंख्येंतील वाढ यांचा अन्योन्य संबंध काय असा प्रश्न साहजिकच निर्माण होतो. आपल्या दैनंदिन अन्नाचे साधारणतः चार प्रकार पडतात व त्यांतील कोणत्याही एका अन्नप्रकाराची उणीव असली तरी डॉ. द कॅस्ट्रो यांचे मतें त्या विशिष्ट अन्नाची भूक ( Hunger for that specific sort of food ) निर्माण होते. पिष्टमय पदार्थ, ( carbohydrates ), स्निग्ध पदार्थ ( लोणी वगैरे ), जीवनसत्त्वें ( vitamins ) व प्रोटीन्स या सर्वांची आवश्यकता दैनंदिन आहारांत असते. परंतु यांतील एखादा प्रकार जरी नसला तरी त्या विशिष्ट अन्नप्रकाराची टंचाई शरीरांत निर्माण होऊन, त्या चिरकालीन टंचाईमुळें माणसाच्या शरीरावर कांहीं विशिष्ट परिणाम घडून येतात. प्रोटीन्स व जीवनसत्त्वें यांच्या उणीवेमुळें दिसून येणारे परिणाम विशेष नजरेंत भरण्यासारखे आहेत. दूध, मांस व अंडीं यांमध्यें प्रोटीन्स भरपूर प्रमाणांत असतात. प्रोटीन्समुळें

आपल्या शरीरांत रोगांविरुद्ध लढणाऱ्या शक्तींची निर्मिति होत असते, आणि त्यांच्या अभावामुळेंच असंख्य लोक सांसर्गिक रोगांस बळी पडत असतात. डॉ. कॅस्ट्रो म्हणतात कीं मानवांना व पशूंना चिरकालपर्यंत तीव्र अशा अन्नटंचाईस तोंड देण्याची पाळी आली तर त्यांच्यामधील लैंगिक शक्तीचा ऱ्हास होतो, एवढेंच नव्हे तर त्यांच्या प्रजोत्पादनक्षमतेवरही त्याचा परिणाम दिसून येतो. ( पान ६३ ). " under the action of hunger there is rapid and universal loss of libido. If we compare the birth-rate with the consumption of animal proteins, we find the fertility going down as the consumption of such proteins rises " ( पान ६८ ). डॉ. कॅस्ट्रो पुढें म्हणतात कीं यकृत् व स्त्रीबीजग्रंथि यांच्या कार्याचा परस्परसंबंध आहे. स्त्रीबीजग्रंथींतून रक्तामध्यें जीं स्त्रीबीजें येतात त्यांतील जादा असणाऱ्या स्त्रीबीजांना निष्क्रिय करण्याचें कार्य यकृताकडून होतें. अन्नांतील प्रोटीन्सच्या अभावामुळें यकृताच्या या कार्यशक्तीवर परिणाम होतो. प्रोटीन्सच्या अभावामुळें यकृतामधील शक्ति निकामी होऊं लागतात, व त्याचा परिणाम स्त्रीबीजें निष्क्रिय करण्याच्या यकृताच्या कार्यावर होतो. अन् साहजिकच शेवटीं सर्वांचा परिणाम स्त्रीच्या प्रजोत्पादनक्षमतेमध्यें वाढ होण्याकडेच होतो ( पान १४० ). डॉ. द कॅस्ट्रो म्हणतात कीं अर्धपोटी जीवनामुळें मानवाची अन्नावरील वासना कमी झाली तरी त्याच्या लैंगिक वासनेमध्यें वाढ दिसून येते. अन् यामुळेंच अर्धपोटी माणसें लोकसंख्येमध्यें मोठी भर टाकीत असलेलीं दिसून येतात. ( पान १४१ ).[१]

प्रोटीन्सच्या कमतरतेमुळें यकृताच्या कार्यावर होणारा विवक्षित परिणाम व वर्षानुवर्षे अर्धपोटी जीवन जगणाऱ्या लोकांच्या मध्यें मोठ्या प्रमाणावर दिसून येणारी लैंगिक भूक किंवा त्यांच्या प्रजोत्पादन-

---

१ प्रोटीन्सयुक्त आहाराचा प्रजोत्पादनक्षमतेवर कसा परिणाम दिसून येतो यासंबंधी पुढील आंकडेवारी द कॅस्ट्रो यांनीं दिली आहे.

**प्रजोत्पादनक्षमता ( Fertility ) व प्रोटीन्सयुक्त आहार यांचा संबंध.**

| देश | जन्माचें प्रमाण (Birth rate) | रोजच्या आहारांतील प्रोटीन्सचें प्रमाण (ग्रॅम्समध्यें) |
|---|---|---|
| फोर्मोसा | ४५·६ | ४·७ |
| मलाया | ३९·७ | ७·५ |
| हिंदुस्थान | ३३·० | ८·७ |
| जपान | २७·० | ९·७ |
| युगोस्लाव्हिया | २५·९ | ११·२ |
| ग्रीस | २३·५ | १५·२ |
| इटाली | २३·४ | १५·२ |
| बल्गेरिया | २२·२ | १६·८ |
| जर्मनी | २०·० | ३७·३ |
| आयर्लंड | १९·१ | ४६·७ |
| डेन्मार्क | १८·३ | ५९·१ |
| ऑस्ट्रेलिया | १८·० | ५९·९ |
| युनायटेड स्टेट्स | १७·९ | ६१·४ |
| स्वीडन | १५·० | ६२·६ |

वरील कोष्टकावरून दिसून येते कीं ज्या देशांमध्यें लोकांच्या दैनंदिन आहारांतील प्रोटीन्सचें प्रमाण कमी आहे तेथें त्यांच्या प्रजोत्पादनक्षमतेमध्यें वाढ दिसून येते.

क्षमतेमध्यें होणारी वाढ याच दोन मुद्द्यांस डॉ. कॅस्ट्रो यांनीं आपल्या विवेचनांत महत्त्व दिलें आहे. अन्नाचें उत्पादन मोठ्या प्रमाणावर वाढवून असंख्य लोकांचें अर्धपोटी जीवन नष्ट करणें व त्यांच्या रोजच्या आहारांतील प्रोटीन्सची उणीवहि कमी करणें शक्य आहे.

पण हें कसें घडून येणार ? डॉ. द कॅस्ट्रो यांनीं या प्रश्नाचेंहि उत्तर दिलें आहे. परंतु ते उत्तर देण्याआधीं वाचकाला त्यांनीं अत्यंत मनोरंजक अशा ऐतिहासिक विवेचनामधून बरेंच हिंडविलें आहे. त्यांच्या पुस्तकांतील बराचसा भाग साम्राज्यवादी राष्ट्रांनीं वसाहतींची केलेली पद्धतशीर पिळवणूक व उपासमार यांच्या माहितीनेंच भरलेला आहे. डॉ. कॅस्ट्रो म्हणतात कीं " वसाहतींच्या नैसर्गिक संपत्तीची अमानुष पिळवणूक, जमीनीच्या मालकी हक्कामधील मक्तेदारी, व सतत वर्षानुवर्षें जमीनींतून एकच पीक काढून घेण्याची (monoculture) पद्धतीच वसाहतींच्या उपासमारीस कारणीभूत आहेत. वरील कारणामुळें औद्योगिक दृष्ट्या पुढारलेल्या राष्ट्रांना लागणारा कचा माल अत्यंत स्वस्त दरांत मिळत असे...... उपासमार व अन्नाची कायमची टंचाई यांनीं कायम वस्ती केलेले भाग म्हणजे औद्योगिक दृष्ट्या पुढारलेल्या साम्राज्यवादी राष्ट्रांच्या वसाहतीच होत ! "

जगांतील मागासलेल्या प्रत्येक देशांतील अन्नपरिस्थितीचें डॉ. कॅस्ट्रो यांनीं अत्यंत हृदयद्रावक असें वर्णन केलेलें आहे. दक्षिण अमेरिकेंतील परिस्थितीच्या वर्णनापासूनच त्यांनीं सुरुवात केली आहे. दक्षिण अमेरिकेंतील निरनिराळीं राष्ट्रें आज राजकीय दृष्ट्या स्वतंत्र वाटलीं तरी अमेरिकन संयुक्त संस्थानां-(U. S. A.) च्या आर्थिक गुलामगिरींत तीं जखडून गेलेलीं आहेत. डॉक्टरसाहेबांचें स्वतःचें ब्राझिल हें राष्ट्र त्यास अपवाद नाहीं. म्हणूनच सुरवातीसच ते म्हणतात कीं " दक्षिण अमेरिकेमध्यें एकही असें राष्ट्र नाहीं कीं तेथील प्रजा उपासमारीपासून मुक्त आहे. " या राष्ट्रांतील लोकांच्या आहारांत प्रोटीन्सची वाण मोठ्या प्रमाणावर दिसून येते. तुलनेसाठीं कांहीं आकडे पहा: सर्वसाधारणतः द. अमेरिकेंतील प्रत्येक देशांत दरडोई ६६ पौंड मांस दरवर्षी खपतें, तर कॅनडामध्यें दरडोई १३२ पौंड, यु. एस. ए. मध्यें १३० पौंड व अर्जेंटिनामध्यें ३०० पौंड मांस खपतें. दुधाची परिस्थिति कांहीं फारशी वेगळी नाहीं. ब्राझिलमधील अमेझान प्रांतांत दूध जवळ जवळ मिळतच नाहीं. पेरुमध्यें दरडोई दुधाचा खप वर्षाला ११ क्वार्ट्स आहे, चिलीमध्यें १४ क्वार्ट्स, इक्वेडोर मध्यें २६ क्वार्ट्स अन् व्हेनिसुएलामध्यें ३८ क्वार्ट्स एवढें दूध मिळतें. याच्या उलट उत्तर अमेरिकेमध्यें दरडोई ११० क्वार्ट्स व डेन्मार्क किंवा स्विट्झरलंडमध्यें हा आंकडा अनुक्रमें १६४ व २६३ असा आहे. बोलीव्हिया किंवा अर्जेंटिनामध्यें बालमृत्यूचा आंकडा सर्व जगांत मोठा असलेला ( बोलीव्हिया—दर हजारीं प्रमाण २७७ व अर्जेंटिना ३५५ ) दिसून येतो.

या परिस्थितीस जबाबदार कोण ? अत्यंत दाट लोकवस्तीमुळें द. अमेरिकेंतील लोकांना उपासमार सहन करावी लागते का ? मुळींच नाहीं. तर डॉ. कॅस्ट्रो म्हणतात कीं— " द. अमेरिकेंतील दोन अगर तीन देश सोडले तर, इतर भागांत दाट लोकवस्ती आहे असें विधान बुईल्यम व्होग्नें कोणत्या आधारावर केलें हें समजणें कठीण आहे. कारण वस्तुस्थिति अशी आहे कीं द. अमेरिकेमध्यें लोकवस्तीचें प्रमाण एका चौरस मैलास १३ एवढें विरळ आहे. " दाट लोकवस्ती हें जर अन्नतुटीचें कारण होऊं शकत नाहीं तर लागवडीखालीं येऊं शकेल अशा जमीनीचा तुटवडा तर या परिस्थितीस कारणीभूत नसेल ? या प्रश्नासही डॉक्टरांचें उत्तर " नाहीं " असेंच आहे. द. अमेरिकेंतील २५ टक्के जमीन लागवडीखालीं येऊं शकेल अशी आहे. पण आज त्यापैकीं फक्त पांच टक्केच जमीन उपयोगांत आणली जात आहे. यूनोच्या अन्न व शेतीविषयक ( F. A. O. ) कमिटीच्या असें निदर्शनास आलें आहे कीं, द. अमेरिकेमध्यें लोकवस्ती अत्यंत विरळ असून देखील दरडोई पिकाऊ जमीन १·५ एकरच येऊं शकते. उत्तर अमेरिकेमध्यें हें प्रमाण ४ एकर आहे. " द. अमेरिकेमधील अन्नटंचाईस, निसर्गापेक्षां सामाजिक परिस्थितीच मुख्यतः कारणीभूत आहे" असे उद्गार डॉ. कॅस्ट्रो यांनीं काढले आहेत. व्यापारी वृत्तीनें शेंकडों वर्षें करण्यांत येत असलेली पिळवणुक हीच ती सामाजिक परिस्थिति होय. पिळवणुकीचे हे प्रकार निरनिराळ्या आर्थिक चक्रां-( economic cycles )च्या साहाय्यानें अंमलांत आणण्यांत आले. सोनें, साखर, मौल्यवान्







दगड, कॉफी, रबर व खनिज तेल अशा निरनिराळ्या आर्थिक भरभराटीच्या लाटा द. अमेरिकेंतील देशांत येऊन गेल्या. आणि या प्रत्येक आर्थिक भरभराटीच्या लाटेसरशीं त्या विशिष्ट प्रदेशांतील जमीनीमधून साखर अगर कॉफी या सारख्या एकाच पिकाची लागवड करून (monoculture करून) इतर सर्व गोष्टींकडे दुर्लक्ष करण्यांत आलें. यामुळें त्या देशांतील नैसर्गिक संपत्ति व तिच्या ठिकाणीं असलेली विपुलता निर्माण करण्याची ताकद यांकडे बुद्धिपुरस्सर दुर्लक्ष करण्यांत आलें. व साहतींच्या पिळवणुकीस आणखी एक कारण म्हणजे लागवडीखालीं असलेल्या जमिनीची मक्तेदारी मालकी अन्नतुटवडा निर्माण करण्यासहि तेवढीच जबाबदार आहे. क्षेत्रफळाच्या दृष्टीनें ब्राझिल फ्रान्सपेक्षां पंधरा पट मोठा आहे. दोघांची लोकसंख्या सारखीच भरेल. पण त्यांच्यामधील जमीनमालकीचें प्रमाण किती व्यस्त आहे तें पहाः ब्राझीलमध्यें १९,००००० जमीनमालक ( individual proprietors ) आहेत, तर फ्रान्समध्यें ते ४०,००००० आहेत. एकंदर क्षेत्रफळापैकीं २ टक्के जमीनच ब्राझीलमध्यें लागवडीखालीं आहे अन् त्यांतील एक टक्क्यांतच तेवढें अन्नाचें उत्पादन करण्यांत येतें.

"अमेरिका ( U. S. A. ) या राष्ट्रांकडे ( म्हणजे ब्राझिल व इतर द. अमेरिकेंतील राष्ट्रें यांकडे ) आपल्या साम्राज्यवादी हितसंबंधाचें रक्षण करण्याच्या दृष्टीनेंच पहातें. अमेरिकन संयुक्त संस्थानांनी या देशांतील मोठ्या जमीनदारांना स्वतःच्या बळाचें संरक्षण दिल्यानें तेथील सामाजिक क्रांति थोपवून धरण्यांत आली. अन् त्याचा परिणाम ते देश कायमचे दरिद्री राहण्यांत झाला " ( पान १०९ ) असा शेरा वर्णनाच्या ओघांत डॉ. कॅस्ट्रो यांनीं दिला आहे. आशिया किंवा आफ्रिका खंडांत याहून कांहीं वेगळी परिस्थिति दिसते काय ? हिंदुस्थानांतील परिस्थिति काय दर्शविते ? " असंख्य लोक कायमच्या उपासमारीच्या व विशिष्ट अंतरानें येणाऱ्या दुष्काळाच्या तडाख्यांत सांपडलेले दिसतात. " हिंदी लोकांचें सरासरी वयोमान २५ वर्षांचेंच आहे, ४० टक्के मुलें पांच वर्षांचें वय होण्यापूर्वींच मरतात. हिंदुस्थानांतील दारिद्र्य व चिरकालीन उपासमारीचीं कारणें हीं जमीनदारी पद्धति व ब्रिटिशांचे साम्राज्यवादी वसाहतीचें धोरण यांतच शोधलीं पाहिजेत, असें डॉ. कॅस्ट्रो यांनी म्हटले आहे (पान १५४). डॉक्टरसाहेब पुढें म्हणतात कीं दुष्काळी परिस्थिति हिंदुस्थानांत जवळ जवळ कायमचीच आहे परंतु तिची तीव्रता व व्याप्ति यांची वाढ मात्र, एकोणीसाव्या शतकांत तेथील आर्थिक जीवनांत इंग्रजांच्या पदक्षेपामुळेंच झाली असें म्हणावें लागतें ( पान १५२ ). आशियामधील लोकसंख्येच्या दृष्टीनें अन्नाच्या तुटवड्याचा असा दुसरा मोठा देश म्हणजे चीन ! " बुभुक्षितांचा एकत्रित असा प्रचंड समुदाय " असें एका अमेरिकन लेखकानें चीनविषयीं काढलेले उद्गार डॉक्टरांनीं उद्धृत केले आहेत. चिनी लोकांना परिमाणात्मक उपासमारीस तोंड द्यावें लागतें ( Chinese suffer, first of all, from quantitative hunger, the lack of enough energy to cover the needs of living and working ). याचें कारण काय ? " जमीनीचे अगदी लहान लहान तुकडे पाडण्यामुळें जमीनीच्या मक्तेदारी मालकी (Latifundia ) ऐवजीं असंख्य लहान लहान मालकी हक्कांचा प्रश्न चीनमध्यें निर्माण होतो " असें कॅस्ट्रो यांनीं म्हटलें आहे तें विचित्र वाटतें. कारण १९४९ च्या क्रांतीपूर्वी चीनमधील जमीनमालकीचें स्वरूप हें मक्तेदारी मालकीचेंच होतें. क्रांतीपूर्वी तेथील शेतकरी सरासरी ४·१८ एकर जमीन कसत होता तरी ती जमीन त्याच्या मालकीची नव्हती. जमीनीचे असंख्य लहान लहान तुकडे हे जमीनदारांनींच केलेले होते. त्याची मुख्यतः तीन कारणें संभवतात तीं अशींः ( १ ) जगांतील कुठल्याही इतर देशाच्या मानानें शेती कसणें हा उद्योग जवळ जवळ २००० वर्षांपासून चीनमध्यें चालू आहे. (२) तेथील प्रचंड लोकसंख्येमुळें लागवडीखालीं असलेली जमीन व ती कसणारे शेतकरी यांतील प्रमाण व्यस्त आहे. जमीन थोडी व कसणारे शेतकरी जास्त ! ( ३ ) तिसरें प्रमुख कारण असें कीं जमीनीवरील कसणाऱ्या शेतकऱ्याचा हा बोजा ज्यामुळें कमी होईल असे मोठ्या प्रमाणावरील उद्योगधंदे आजवर चीनमध्यें अस्तित्वांतच नव्हते. गेल्या तीन वर्षांतील चीनमधील सामाजिक व आर्थिक बदल पाहिले म्हणजे डॉ. कॅस्ट्रो यांचें वरील विधान विचित्र वाटल्या शिवाय राहात नाहीं. ते म्हणतात कीं चीनच्या सामाजिक नि आर्थिक परिस्थितीमध्यें मूलभूत












फरक घडवून आणल्याशिवाय चीनमधील लोकसंख्येची वाढ परिणामकारकरीत्या थांबवितां येणार नाहीं, चीनमध्यें प्रत्येक गोष्टींत एकदम बदल तरी घडवून आणला पाहिजे किंवा स्वस्थ तरी बसलें पाहिजे. डॉ. कॅस्ट्रो यांचें पुस्तक १९५२ सालीं प्रसिद्ध झालें. डॉक्टरसाहेबांच्या अपेक्षेप्रमाणें १९४९ पासूनच चीनमधील परिस्थितींत सामाजिक नि आर्थिक बदल घडून येत आहेत. परंतु त्या बदलांची दखल डॉक्टरमजकुरांनीं घेतलेली दिसत नाहीं. साम्राज्यवादी राष्ट्रें मागासलेल्या देशांच्या प्रगतीच्या आड कशीं येतात याचें चीनसंबंधी केलेलें वर्णन सर्व मागासलेल्या देशांना लागूं होण्यासारखें आहे : " चीनच्या गेल्या शतकांतील इतिहासाकडे दृष्टिक्षेप टाकला तर असें दिसून येतें कीं साम्राज्यवादी राष्ट्रांनीं वेळोवेळीं अन्नाचें उत्पादन वाढविणाऱ्या शेतीसुधारणा व चीनच्या अर्थव्यवस्थेस आधुनिक स्वरूप देणाऱ्या औद्योगिक सुधारणा यांना अडथळे आणले आहेत. परंपरेनें चालत आलेलें आर्थिक जीवन, त्याची जागा घेणारे उद्योगधंदे निर्माण न करतां, साम्राज्यवादी राष्ट्रांनीं आपलें दडपण आणून अस्ताव्यस्त करून टाकलें. शेतजमीनीचे असंख्य लहान तुकडे करण्यांत व शेतीवर अवलंबून असणाऱ्या लोकसंख्येंत भर टाकण्यांतच पाश्चिमात्य राष्ट्रांनीं आपली शक्ति खर्च केली. अन् या तऱ्हेनें चिनी शेतकऱ्याच्या उपासमारींत त्यांनीं भर घातली " ( पान १४४–४५ ).

सर्वच्या सर्व आफ्रिका भुकेलेली आहे असे कठोर उद्गार द कॅस्ट्रो यांनी काढले आहेत. आफ्रिकेंतील नीग्रोंचा ज्या ज्या ठिकाणीं युरोपियन लोकांशीं संबंध आला त्या ठिकाणीं त्यांच्या अन्नांत महत्त्वाचा फरक घडून येऊन त्यांचें शरीर निकृष्ट बनत गेलें. अत्यंत दाट जंगलांत राहणारे बांटू नीग्रो व युरोपियन लोकांशी संबंध आलेले बांटू यांच्या शरीरप्रकृतीसंबंधी चौकशी करण्यांत आली असतां असें आढळून आलें कीं, दाट जंगलांत राहणारे बांटू जास्त निरोगी आहेत. डॉ. प्रेस्टन प्राईस यांनीं म्हटलें आहे कीं केनयामधील सहा मागासलेल्या जमातींच्या अन्नासंबंधी चौकशी केली असतां आढळून आलें कीं किडलेल्या दातांसंबंधी एकाहि व्यक्तीनें तक्रार केली नाहीं अगर एकाहि व्यक्तीच्या दांतांच्या कवळीच्या रचनेमध्यें विकृति दिसली नाहीं. परंतु जेव्हां याच जमातींना सुधारलेल्या पद्धतीचें अन्न ( civilized diet ) देण्यांत आलें तेव्हां त्यांचे दांत किडण्यास सुरवात झालेली दिसून आली. डॉ. ट्रॉवेल यांना युगांडा व केनयामध्यें स्वतःच्या २० वर्षांच्या वैद्यकीय अनुभवांत क्वाश्किओरकोर (kwaskiorkor ) किंवा malignant malnutrition या रोगाचे असंख्य रुग्ण पहाण्यास मिळाले. विशेषतः लहान मुलांच्यामध्यें या रोगाचें प्रमाण जास्त दिसून आलें. या रोगांत मुलांच्या लिव्हरमध्यें बिघाड होऊन अतिसार, पोट मोठें होणें, पायावर सूज व त्वचा नि केस यांच्या रंगांत पालट होणें वगैरें लक्षणें होतात. प्रोटीन्सची अन्नांतील उणीव हेंच या रोगांस कारण आहे. साम्राज्यवाद्यांच्या पिळवणुकीचे दोन प्रकार आफ्रिकेमध्यें दिसून येतात. तद्देशीय लोकांच्या ताब्यांतील जमीन काढून घेणें व जमीनीवरील निरनिराळे कर पैशाच्या रूपांत घेणें; तद्देशीय लोकांच्या ताब्यांत एवढी थोडी जमीन ठेवावयाची कीं त्या जमीनीच्या उत्पादनावर पोट भागविणें त्यांना दिवसेंदिवस कठीण व्हावें. केनयामधील परिस्थिति वरील विधानाची प्रचीति देतच आहे.

मागासलेल्या देशांत ही परिस्थिति असली तरी अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें उपासमार व अन्नटंचाईपासून मुक्त आहेत काय ? " जगांतील अन्नटंचाईदर्शक नकाशांमध्यें अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांचा कांहीं भाग पाहून पुष्कळांना आश्चर्य वाटेल. अमेरिकेच्या दक्षिण संस्थानांत उपासमार आढळून येते. ५ लक्ष चौरस मैल एवढा हा प्रदेश भरतो व त्यामध्यें ३ कोटी लोकसंख्या आढळून येते". या द. संस्थानांची डॉ. कॅस्ट्रो यांनीं यादी दिली आहे. व्हर्जीनिया, उत्तर व दक्षिण कॅरोलिना, केंटुकी, टेनीसी, जार्जिया, फ्लॉरिडा, अलाबामा, मिसिसिपी, लुईझियाना व आराकानास हीं तीं संस्थानें होत. या संस्थानांतील ७३ टक्के लोक उपासमार सहन करीत असलेले दिसून येतात. द कॅस्ट्रो म्हणतात कीं " ही एक विलक्षण गोष्ट वाटण्याचा संभव आहे. दक्षिणेकडील संस्थानांतील शेतकऱ्यांच्या दारिद्र्याचा इतिहास अत्यंत कठोर आहे. " तेथील जमीनमालक व शेतकरी यांच्यामधील संबंध निमगुलामी–







( semi-slavery )चेच आहेत असें कॅस्ट्रो यांनीं लिहिलें आहे. अमेरिकेंतील सिलेक्टिव्ह सव्हिर्सेस बोर्डानें घेतलेल्या १,४०००००० अमेरिकन तरुणांच्या परीक्षेंत फक्त १५ टक्के तरुणच अपेक्षित अशा शारिरिक प्रकृतीचे आढळून आले. युद्धाच्या सहा वर्षांच्या काळांत युरोपमधील शेती–उत्पादनांत ४० टक्के घट दिसून आली. याचे परिणाम युरोपमधील अन्नपरिस्थितीवर फार गंभीर झाले. कारण युद्धांतील हानि वगळली तरी या सहा वर्षांच्या काळांत युरोपच्या लोकसंख्येंत २० टक्यांनींच घट झाली आहे.

उपासमार व अन्नटंचाईचें एवढें सर्वकष चित्र रेखाटल्यानंतर तें नाहींसे करण्याच्या उपायांची चर्चा पुस्तकाच्या शेवटच्या भागांत केली आहे. उपासमारीविरुद्ध चढाई (Advance against hunger) असें त्या प्रकरणांस त्यांनीं नांव दिलें आहे. त्याचा थोडक्यांत निष्कर्ष असाः जगांतील प्रत्येक व्यक्तीस भरपूर अन्न देण्याची ताकद या भूमीमध्यें वसत आहे हें सत्य, मानवांपासून इतःपर लपवून ठेवतां येणार नाहीं. उपासमारीचा नाश ही कांहीं काल्पनिक गोष्ट नव्हे. पूर्णपणें वस्तुस्थितीमध्यें आणतां येईल असेंच तें ध्येय आहे. त्यासाठीं जरूरी एवढ्याचीच आहे कीं जमीन व मानव यांमधील संबंधांची परत योग्य मांडणी झाली पाहिजे; व जमीनीचें धन योग्य रीतीनें वाटण्यांत आलें पाहिजे. अभ्यासानें हें दिसून येतें कीं उपासमार ही भौगोलिक कारणांपेक्षां आर्थिक कारणांनींच होत असते. उपासमार हें एक सामाजिक सत्य आहे अन् नैसर्गिक संपत्तीचा योग्य विनियोग न केल्यामुळेंच उपासमार घडून येते. व्होग्ट ज्याला Biotic potential किंवा जीवशक्तींच्या कार्यामुळें निर्माण होणाऱ्या परिस्थितीवर आधारलेले अंदाज म्हणतो ते सुद्धां कांहीं सदासर्वकाळ एकच असूं शकत नाहींत. जमीनीची biotic potential उत्पादनशक्ति ही अमर्याद आहे; उत्पादक शक्ति, जमीन व लोकसंख्या यांचें परस्पर संबंध आजवर चुकीच्या मार्गांनीं व अशास्त्रीय अशा आंधळया अनुभवज्ञानाच्या साहाय्यानें ( blind empiricism नें ) हाताळले गेले आहेत. व्होग्ट सारख्या माल्थसूच्या अभिमान्यांचें एका गोष्टीकडे दुर्लक्ष होत असतें कीं एका चौरस मैलांत विशिष्ट लोकसंख्या या प्रमाणांत जमीन ही कधींच जास्त लोकसंख्येनें युक्त ( over populated ) असत नाहीं, तर प्रत्येक चौरस मैलांत राहणाऱ्या लोकांच्या आर्थिक परिस्थितीच्या प्रमाणांत लोकसंख्या दाट कीं विरळ असा हिशेब केला जातो. शेवटीं जागतिक समृद्धीच्या भूगोलाचें वर्णन ( Geography of abundance ) लिहण्याची पाळी स्वतःवर यावी अशी शुभेच्छा डॉ. कॅस्ट्रो यांनीं प्रदर्शित केली आहे.

आज जगामध्यें ज्या देशांत अशी समृद्धि निर्माण झाली आहे व होत आहे अशा देशांतील अन्नपरिस्थितीचें वर्णन व लोकसंख्येच्या वाढीच्या प्रश्नाच्या स्वरूपाची चर्चा आपल्या पुस्तकांत डॉ. कॅस्ट्रो यांनीं केली असती म्हणजे त्यांच्या पुस्तकांत अधिक पूर्णता आली असती. वसाहतवादाचा नाश किंवा मानव व जमीन यांमधील संबंधाची नव्यानें मांडणी, सोव्हिएट युनियन, चीन व पूर्व युरोपमधील नवलोकशाही राष्ट्रें यांमध्यें प्रत्यक्षांत झाली आहे. त्या देशांतील लोकांच्या पुढें लोकसंख्येस आळा कसा घालावयाचा किंवा वाढत्या लोकसंख्येस अन्न कोठून आणावयाचें हा प्रश्न राहिलेला नाहीं; उलट जमीनसुधारणा अंमलांत आणल्यानें अन्नटंचाई दूर होऊन लोकसंख्या वाढत आहे असा उल्लेख तेथील राज्यकर्ते करीत आहेत. 'बुभुक्षितांचा एक प्रचंड तलाव' या, एका अमेरिकन लेखकाच्या मताचा उल्लेख चीनसंबंधीच्या वर्णनांत डॉ. कॅस्ट्रो यांनीं केला. चीनमधील लोकसंख्येच्या वाढीचा प्रश्न व अन्नोत्पादन यासंबंधीं विस्तृत चर्चा त्यांनीं केली परंतु गेल्या तीन वर्षांत तेथील परिस्थितीमध्यें जो मूलभूत फरक दिसून येत आहे त्याचा कोठेंही उल्लेख त्यांनीं आपल्या चर्चेत केला नाहीं. चीनच्या कम्युनिस्टांबद्दल ते लिहितात कीं " उपासमारीपासून कायमची सुटका व्हावी अशी उत्कट इच्छा चीनचा शेतकरी आज शतकानुशतकें उराशीं बाळगून आहे. कम्युनिस्टांचा कार्यक्रम व चिनी शेतकऱ्याच्या मनांतील ही उत्कट इच्छा यांचा वस्तुस्थितीमध्यें संयोग घडून आल्यानें चीनमध्यें कम्युनिस्ट यशस्वी झाले. "

चीनच्या कम्युनिस्टांनीं चीनचा शेतकरी व आज हजारों वर्षें तो कसत असलेली जमीन यांच्यामधील संबंधाची








परत नव्यानें मांडणी केल्यानें अन्नाचें उत्पन्न एवढें प्रचंड वाढलें कीं, ४५ कोटींना भरपूर खाऊं घालून हिंदुस्थानसारख्या राष्ट्रास अन्न पुरविण्याची तयारी चीन आज दाखवूं शकतो. यादवीयुद्धानें अस्ताव्यस्त झालेल्या आर्थिक जीवनाची घडी नीट सुधारून पंच-वार्षिक योजना अंमलांत आणण्याची तयारी चीननें केली आहे. पंचवार्षिक योजनेच्या पहिल्या वर्षांतच धान्य–उत्पादन १०० वरून १०९ पर्यंत वाढविण्याचें ठरविण्यांत आलें आहे. १९५२ सालाशी तुलना करतां, सामाजिक–सांस्कृतिक व शैक्षणिक प्रगतीचा खर्च ५५·८६ °/ₒ टक्यांनीं जास्त होईल. (हे आंकडे चाऊ एन लाय यांच्या राजकीय सल्लागारपरिषदेपुढील फेब्रुवारी १९५३ मधील भाषणामधून घेतले आहे ) परंतु डॉ. कॅस्ट्रो यांच्या मनांत चीनच्या राज्यकर्त्यांच्या कर्तृत्वाबद्दल संशय असावा असें वाटतें. कम्युनिस्टांच्या यशाबद्दल लिहल्या-नंतर पुढच्याच वाक्यांत ते लिहतात कीं—" Never before has the world been so dependent on what happens in China. If this gigantic body of human beings finds a way to survive and to raise its living standards, the pressure on world economy would be relieved for a long time to come. But if China goes down in the shipwreck of misery and destruction, she is likely to pull down the rest of the world down with her " (page 148)–डॉक्टरांचे वाक्यांतील " If " त्यांच्या मनांतील संशयच दर्शवीत नाहींत काय ? पण गेल्या तीन वर्षांत चीननें केलेली प्रगति विश्वासानें हेच सांगत आहे कीं अशी भीति बाळगण्याचें कारण नाहीं.

सोव्हिएट युनियननें तेथील जनतेच्या भौतिक व सांस्कृतिक राहणीमध्यें जी प्रचंड प्रगति केली आहे तिच्या संबंधीं डॉ. कॅस्ट्रो एक अक्षरहि लिहूं शकले नाहींत ही त्यांच्या पुस्तकाची ठळक उणीव आहे. जागतिक अन्न-टंचाई व लोकसंख्येच्या प्रश्नाची चर्चा सोव्हिएटला वगळून आजच्या परिस्थितींत पुरी होऊंच शकत नाहीं. सोव्हिएटबद्दल पुढील त्रोटक उल्लेख त्यांनी एके ठिकाणीं केला आहे. आपल्या चर्चेच्या सोयीसाठीं आशियाखंडाची विभागणी त्यांनीं पांच नैसर्गिक विभागांत केली. अतिपूर्व, मध्यपूर्व-आग्नेय आशिया वगैरे विभाग सांगून ते लिहितातः "...and finally the immense expanse of continent in the extreme north, which makes up part of the Soviet Union. In this chapter ( i. e. chapter 5th of the book ) first four regions will be treated as a unit, leaving aside the Soviet Union. Soviet Union cannot be considered as entirely Asiatic, just as it is not entirely European. It is in fact a sort of bridge between two continents " ( page 122). पण दोन संस्कृतींचा दुवा सांधणाऱ्या या देशासंबंधीं एकहि शब्द डॉक्टर कॅस्ट्रो लिहूं शकले नाहींत, याचें आश्चर्य वाटतें. सोव्हिएट युनियननें उपासमार व अन्नटंचाई कायमची नाहींशी कशी केली याची चर्चा डॉ. कॅस्ट्रो यांनीं आपल्या पुस्तकांत केली असती तर " जगांतील प्रत्येक व्यक्तीस भरपूर अन्न देण्याची ताकद या भूमीमध्यें वसत आहे हें सत्य मानवांपासून इतःपर लपवून ठेवतां येणार नाहीं. उपासमारीचा नाश ही कांहीं काल्पनिक गोष्ट नव्हे–पूर्णपणें वस्तुस्थितीमध्यें आणतां येईल असेंच तें ध्येय आहे " या त्यांच्या उद्गारांस अधिकच बळकटी आली असती. युद्ध संपल्यापासून १९५२ पर्यंत सहा वर्षांत सोव्हिएटमध्यें ५·३ दशलक्ष एकर नवी जास्त जमीन लागवडीखालीं आणण्यांत आली. गव्हाचें उत्पन्न १९४० पेक्षां आज ४८ टक्यांनीं वाढलें आहे. १९५२ सालीं जो नवा पंचवार्षिक कार्य-क्रम मान्य करण्यांत आला तदनुसार पुढील पांच वर्षांच्या काळांत अन्नोत्पादन आजच्यापेक्षां ५० टक्यांनीं वाढविण्याचें ठरविण्यांत आलें आहे. " अन्नप्रश्न हा निश्चितपणें व कायमचा सुटला " असे आत्मविश्वासाचे उद्गार मॅलेन्कोव्हनें आपल्या रिपोर्टामध्यें काढले आहेत.

अन्नटंचाई व उपासमार यांची देशागणिक वर्णनें देत असतां अनेक ठिकाणीं डॉ. कॅस्ट्रो यांनीं म्हटलें आहे

कीं वसाहतींची पिळवणूक व जमीनीची मक्तेदारी मालकी या दोन प्रमुख कारणांमुळें उपासमार व अन्न-टंचाई निर्माण होते. पण या वर्णनांतून ओघानेंच नैसर्गिकरीत्या जे राजकीय निष्कर्ष मनांत येतात ते सांगण्याचे डॉ. कॅस्ट्रो यांनीं कटाक्षानें टाळलें आहे. साम्राज्यवादी राष्ट्रांकडून होत असलेली वसाहतींची पिळवणूक थांबली पाहिजे म्हणजेच वसाहतींना पूर्ण राजकीय स्वातंत्र्य मिळालें पाहिजे व तेथील शेतीची मक्तेदारी मालकीची जमीनदारी पद्धत नष्ट करण्यांत आली पाहिजे असा स्पष्ट राजकीय निष्कर्ष डॉ. कॅस्ट्रो यांनीं आपल्या पुस्तकांत कोठेंही दिलेला नाहीं. संपूर्ण राजकीय स्वातंत्र्य जर नसेल तर या वसाहती मानव व जमीन यांच्या संबंधाची नव्यानें मांडणी कशी करणार ? लॉर्ड बाईड ओर यांनी कॅस्ट्रो यांच्या पुस्तकास लिहिलेल्या प्रस्तावनेची सुरवात देखील पुढीलप्रमाणें केली आहे : " The title of this brilliantly written book might well have been ' Hunger and Politics ', because from the discussions there emerge political issues of the first magnitude ". आणि खरोखरींच अन्नटंचाई व उपासमार हे प्रश्न राजकारणांशीं अगदीं निगडित आहेत. ' Huger has been from time to time a most dangerous force in politics ' असे उद्गार बाईड ओरनींच प्रस्तावने-मध्यें काढले आहेत.

डॉ. कॅस्ट्रो यांच्या पुस्तकांतील वरील प्रमुख उणीवे-मुळें आजच्या परिस्थितींत त्यांच्या पुस्तकाचें महत्त्व कमी होत नाहीं. लोकसंख्येच्या वाढीच्या प्रश्नासंबंधी एक नवा दृष्टिकोण त्यांनीं आपल्यापुढें ठेवला आहे. खरोखरी पाहतां तो नवीन नाहीं. कारण अन्नाची कम-तरता व लोकसंख्येंतील वाढ हीं एकत्र असतात असा सिद्धान्त १८५३ सालींच म्हणजे बरोबर शंभर वर्षांपूर्वी थॉमस डबलडे या गृहस्थानें मांडला होता. पण व्हिक्टो-रिया राणीच्या काळांत उच्च मध्यमवर्गानें आर्थिक व राजकीय हितसंबंधांच्या आहारीं जाऊन ( 'inspired by economic and political interests' पान १४० ) तो गाडून टाकला. डबलडेच्या सिद्धांतानें व्हिक्टोरियाच्या काळांतील उच्च मध्यमवर्गीयांच्या नैतिक भावनांना धक्का बसला. त्या वेळचें सर्व सामाजिक जीवन त्या वर्गाच्याच हातीं असल्यानें डबलडेचा सिद्धांत तो वर्ग गाडूं शकला. शिवाय त्या वेळच्या शास्त्रीय वाढीच्या परिस्थितीमुळें देखील डबलडे आपला सिद्धान्त भरपूर पुराव्यानिशीं सिद्ध करूं शकला नाहीं.

आज तशी परिस्थिति राहिलेली नाहीं. शेती-विषयक शास्त्रीय ज्ञानाची जी प्रचंड प्रगति झाली आहे तीमुळें व सामान्य व्यक्ति त्या शास्त्रीय प्रगतीशीं मोठ्या प्रमाणावर निगडित झाल्याकारणानें, वर्गीय स्वार्थाच्या आड येणारे शास्त्रीय सिद्धान्त उच्च मध्यमवर्ग आज दडपूं शकत नाहीं. त्यामुळेंच शास्त्रांची होणारी अव्याहत प्रगति पाहून, उपासमार व अन्नटंचाई यांची कायमची उचलबांगडी या जगांतून झाल्याशिवाय राहणार नाहीं असा विश्वास निर्माण होतो.

---












प्रा. मु. गो. देशपांडे

# स्त्रियांना मतदानाचा हक्क मिळवून देणाऱ्या मिसेस् पँक्हर्स्ट

[ इंग्लंडमध्यें स्त्रियांना मतदानाचा हक्क कांहीं मर्यादित स्वरूपांत १९१८ सालीं मिळाला व पुढें तो पुरुषांच्या बरोबरीनें सार्वत्रिक असा १९२८ च्या पार्लमेंटच्या कायद्यानें मिळाला. स्त्रियांना मतदानाचा हा मूलभूत हक्क प्राप्त करून देणें हें ज्यांनीं आपलें जीवितकार्य मानलें अशा स्त्रियांमध्यें मिसेस् एमेलिन् पँक्हर्स्ट (१८५८-१९२८) या अग्रगण्य होत. बरोबर ५० वर्षांपूर्वी म्हणजे १९०३ सालीं मिसेस् पँक्हर्स्ट यांनीं आपली मुलगी क्रिस्ताबेल हिच्या साहाय्यानें 'Women's Social and Political Union' ही संस्था काढून स्त्रीमतदानहक्काविषयींच्या आंदोलनाची मुहूर्तमेढ रोंविली. त्या निमित्तानें प्रस्तुत लेखांत मिसेस् पँक्हर्स्ट यांच्या व्यक्तित्वाचा प्रस्तुत लेखांत करून दिलेला परिचय वाचकांस ऐतिहासिक दृष्ट्या उद्बोधक वाटेल. ]

विसाव्या शतकाचें प्रमुख लक्षण कोणतें याविषयीं जर चर्चा सुरू झाली तर अनेकांच्या तोंडांतून अनेक लक्षणें बाहेर पडूं लागतील. आणि तीं सर्व अविवाद्य जरी ठरलीं नाहींत तरी विचारार्ह खासच वाटतील. कोणी म्हणेल, आपल्या शतकाचं प्रमुख लक्षण म्हणजे संशयवाद. कोणी म्हणेल, जगड्व्याळ आणि भीषण महायुद्ध. कोणी म्हणेल, मानसशास्त्राला मिळूं पाहात असलेलं अग्रस्थान हेंच विसाव्या शतकाचं खरं लक्षण आहे. आपल्या काळाचं लक्षण सांगतांना टेनीसन या कवीनें 'जिऑलॉजी' आणि 'ॲस्ट्रॉनॉमी' या दोन शास्त्रदेवतांना भीषण देवता असं म्हटलं होतं व त्यांचं अधिराज्य चालू आहे असं सांगितलं होतं. आज ती जागा कोणी मानसशास्त्राला देऊं केली तर आश्चर्य वाटणार नाहीं. उलट कांहींजण असेंही प्रतिपादतील कीं आपल्या शतकाचं खरं लक्षण म्हणजे शास्त्रानें आपण होऊनच आपली गति कुंठित झाली आहे अशी कबुली दिली हेंच होय. आपण आशियाखंडाचे अभिमानी लोक म्हणूं कीं, या शतकाचें खरं लक्षण भावी इतिहासकार जें लिहून ठेवील तें म्हणजे आशिया खंडाला—किंवा एकंदरींत पूर्वेलाच जें प्राधान्य सध्या मिळत आहे तें होय. आणखी कितीतरी दिशांनीं आपले विचार धावूं लागणें संभवनीय आहे. तथापि, या साऱ्या लक्षणाबरोबरच आणखी एका गोष्टीचा उल्लेख माझ्यासारखा गृहस्थ किंचित् भीतभीत करील. ती गोष्ट म्हणजे स्त्रीस्वातंत्र्याची जवळजवळ जागतिक स्वरूपाची चळवळ हें विसाव्या शतकाचें प्रमुख लक्षण होय.

विसाव्या शतकाच्या आधीं या चळवळीचें स्वरूप अजिबात आढळत नव्हतें असा याचा अर्थ नाहीं. उलट सर्वसामान्य वर्तमानपत्रीय वाचनानें माहितगार झालेलीं माणसं आपल्याला तावडतोब सांगतील कीं अमेरिकेंत १८४८ पासूनच स्त्रियांची मतदानाच्या हक्कासाठीं जोराची चळवळ चालू होती. न्यूझीलंडमध्यें १८९३ मध्येंच स्त्रियांना मतदानाचा व अधिकाराच्या जागा मिळण्याविषयींचा हक्क प्राप्त झाला होता. पण या माहितीमुळें सुधारलेल्या देशांबद्दलचा आपला उद्वेगच अधिक वाढण्याचा संभव आहे. न्यूझीलंडमध्यें जे हक्क स्त्रियांना गेल्या शतकाच्या अखेरीला लाभले ते खुद्द अमेरिकेंत इतकी दीर्घकाळ चळवळ चालूनदेखील १९२० पर्यंत मिळूं नयेत याला काय म्हणावें ? आणि बाकीच्या देशांत तर विसाव्या शतकाच्या दुसऱ्या आणि तिसऱ्या दशकांतच प्रायः या आवश्यक समानतेच्या भूमिकेचा अंगीकार करण्यांत आला. आज ज्या ज्या ठिकाणीं या तत्त्वाचा आचार सुरू झाला आहे त्या ठिकाणीं या चळवळीचें वैयर्थ्य दाखविण्याचा आधुनिक पुरोगामीपणा क्वचित् आढळतो खरा. पण तो भ्रमनिरास आहे असें मानलें तरी त्यामुळें स्त्रीस्वातंत्र्याच्या चळवळीचें मानवी मूल्यांच्या दृष्टीनें ध्यानांत घ्यावं लागणारं महत्त्व तिळमात्र कमी होत नाहीं. आणि ज्या स्वायत्त देशांत अद्यापिही स्त्रियांना हे राजकीय व सामाजिक किंवा आर्थिक हक्क मिळालेले नाहींत त्या देशांतील चळवळी थंड पडण्याची शक्यता अजिबात नाहीं.



अनुक्रमणिका






इंग्लंडांतील स्त्री-शृंखला-विमोचनाचं कार्य अत्यंत प्रभावीपणें ( आणि जहालपणें ) करणाऱ्या मिसेस् पॅंक्हर्स्ट यांचं व्यक्तिचित्र या दृष्टीनं खूपच आकर्षक वाटण्याजोगं आहे.

सामान्य भासणाऱ्या या असामान्य स्त्रीच्या वैचित्र्य-पूर्ण व्यक्तिमत्त्वाचं रहस्य निःसंशय कुतूहलजनक आहे. बालपणांत अशक्तपणामुळं जिला धड शाळेंतील अभ्यास झेंपला नाहीं तिनं उतार वयांत पोलिसी घोड्यांच्या टापांखालीं निर्भयपणानं उभं राहाण्याचं दिव्य करावं; व एका फ्रेंच गृहस्थाशीं विवाहित होण्याची संमति ज्या पित्यानें दिली नाहीं, त्या पित्याच्या हुकमी सत्तेला मान तुकविणाऱ्या बाईनें पुढील आयुष्यांत भर पार्लमेंटांत मुख्य प्रधानाला चिठ्ठी खरडावी; पांच मुलांच्या संगोपनामुळं, त्यांच्या आजारानं व कांहींच्या मृत्यूनं शरीरप्रकृति खालावली असतां व मानसिक त्रासहि पराकाष्ठेचा झाला असतांना देखील स्वतःच्या पक्षाची पोलादी शिस्त बिघडूं न देण्यासाठीं जिनं अत्यंत त्यागी आणि थोर सहकाऱ्यांना देखील पक्षांतून दूर केलं; जिनं जुनाट स्त्रियांच्या मनोवृत्तीप्रमाणें मुलांनीं पानांत न टाकतां सगळंच्या सगळं त्यांना नकोसं वाटत असलं तरी खाल्लंच पाहिजे असा आग्रह जन्मभर सोडला नाहीं--त्याच स्त्रीनं समाजाविरुद्ध जोरदार बंडाची आघाडी उघडावी आणि ती सतत अकरा वर्षे झुंजार-पणानें लढवावी या विसंगतीचा उलगडा करून घेण्याचा प्रयत्न कोणता चरित्रकार केल्यावांचून राहील ? अली-कडच्या चरित्रकारांना तर हा प्रत्येक व्यक्तीचा केंद्रिय बिंदु हेरण्याची विलक्षण हौस आहे. व्यक्तिजीवनांत जी विसंगति आढळते, जे अनेक आडवे-उभे धागे-दोरे आढळतात, जे परस्परविरोधी वाटणारे गुण दिसतात त्यांच्या बुडाशीं नेमकी कोणती प्रेरणा आहे याची बिनचूक सूत्रमय ओळख करून घेण्याचा शिकस्तीचा प्रयत्न आधुनिक चरित्रकार करीत असतात.

आणि त्यांच्या अशा प्रयत्नाला कांहीं अर्थ आहे. एऱ्हवीं मानवी जीवनांतील वैचित्र्य हें ग्रामोफोनच्या रेकॉर्डच्या दोन बाजूला दोन निरनिराळ्या रागांतील, निरनिराळ्या अर्थांच्या,--आणि निरनिराळ्या गवयांनीं देखील--गायिलेल्या पदांसारखें असंबद्ध ठरेल !

ज्याला आनुवंशिक लक्षणें शोधायचीं आहेत त्याला मिसेस पॅंक्हर्स्टच्या आजोबांनीं कॉब्डेनच्या नेतृत्वा-खालीं चाललेल्या लोकांच्या लढ्यांत भाग घेतला होता व सक्तीनें आरमारांत नोकरी करायला लावलं असतांना ती नोकरी सोडून पळून जाण्याची शिताफी दाखविली होती या गोष्टीचं महत्त्व स्वाभाविकच वाटेल. याहीपेक्षां प्रत्यक्ष वडिलांच्या वर्तणुकींत अधिक परिणामकारक असं कांहीं आढळण्याजोगं खासच होतं. अमेरिकन यादवीयुद्धांत सबंध लॅंकेशायर परगणा बेकार होण्याची असह्य स्थिति आली असतां देखील रॉबर्ट गोउल्डन--मिसेस् पॅंक्हर्स्टचे वडील--यांची लिंकनच्या बाजूला होणारी सक्रिय मदत मुळींच थंड पडली नाहीं. वास्तविक केवळ स्वार्थी हेतुनें या प्रश्ना-कडे पाहिलं असतं तर लॅंकेशायरच्या मजुरांनीं अमे-रिकेंतील दक्षिणी संस्थानांची बाजू उचलून धरावयाला पाहिजे होती. पण साधा निरोप पोचविणारा नोकर या स्थितीपासून तों एक कारखानदार अशा उन्नत स्थितीला पोचलेल्या रॉबर्ट गोऊल्डननं स्वतःच्या उदार-मतवादित्वाला अनुसरून लिंकनच्या बाजूनें आपली शक्ति खर्च केली होती. आणि एमेलिन्नें--त्यांच्या सर्वांत थोरल्या मुलीनें--मिसेस पॅंक्सहर्स्टनं त्या लहान वयांत देखील असहाय नीग्रो लोकांसाठीं मदतीदाखल झोळी फिरवली होती ! त्या बालवयांत एमेलिन Uncle Tom's Cabin ही कादंबरी पुन्हां पुन्हां वाचायला घ्यायची आणि त्यांतील करुण प्रसंगांच्या-मुळें हुंदके देऊन रडूं लागायची !

अन्यायाच्या प्रतिकाराचें शिक्षण या दृष्टीनें ही माहिती खचित बिनमोल आहे. त्याचप्रमाणें पुढं वयाच्या तेराव्या वर्षी एमेलिन पॅरिसला शिक्षणासाठीं राहायला गेली. त्या फ्रान्समधल्या तिच्या वास्तव्यांत देखील कांहीं दूरगामी परिणाम घडले असले पाहिजेत. ती 'नोमी' नांवाच्या बालमैत्रिणीची जिवलग दोस्त बनली. नोमीचे वडील बंडखोर होते. त्यांनीं त्या वेळच्या नेपोलिअनच्या जुलमी हुकमतीविरुद्ध प्रचार चालू केला होता व त्यामुळें ते हद्दपारीची शिक्षा भोगीत होते. कल्पनारम्य उदारमतवादी मनाला भुरळ पडण्याजोगंच हें धीरोदात्त वर्तन होतं. साहजिकच एमेलिननं आपल्या हृदयमंदिरांत नोमीच्या वडिलांना अत्यंत हळुवार भावनांनीं अधिष्ठित केलं. पण एवढ्यामुळें देखील भावी बंडखोरीचं बीज एमेलिनच्या अन्तःकरणांत दृढमूल झालं असें खात्रीनें म्हणतां








# स्त्रियांना मतदानाचा हक्क मिळवून देणाऱ्या मिसेस् पॅंक्हर्स्ट

येण्यासारखें नाहीं. कारण तिची प्रामाणिक इच्छा सतत फ्रान्समध्येंच राहायला मिळावं अशी होती. पॅरिसच्या वातावरणाशीं ती इतकी तन्मय झाली होती कीं नोमीनें जेव्हां तिला एखादा फ्रेंच पति निवडण्याचा सल्ला दिला तेव्हां तो सल्ला तिला अतिशयच आवडला. वास्तविक अशा तेजस्वी जागतिक कीर्तीच्या स्त्रीनें आपल्या विवाहस्वातंत्र्याची गळचेपी बापाकडून सहन करावी हें अत्यंत विलक्षण वाटणारें आहे. या सर्व विवाहप्रकरणाची हकीकत तर अधिकच विस्मयकारक आहे. एमेलिनच्या मनांत फ्रेंच गृहस्थाशीं विवाहबद्ध व्हायचं होतं. नोमीच्या वडिलांबद्दल तर तिला आकर्षण होतंच. पण फ्रेंच गृहस्थाशीं लग्न करायला कांहींतरी हुंडा तिनं द्यायला पाहिजे होता. तिची हुंडापद्धतीला मुळींच हरकत नव्हती. पण तिच्या वडिलांना काल्पनिक ध्येयवादामुळं हुंडा ही बाब असह्य वाटली. त्यांनीं तिला तावडतोब फ्रान्समधून घरीं बोलावलं; आणि त्यानंतर निमूटपणें परत येणाऱ्या एमेलिननं आपल्या दुप्पट वयाच्या डॉ. पॅंक्हर्स्ट या अत्यंत सज्जन व निःस्वार्थी मजूर कार्यकर्त्याशीं विवाह केला ! डॉ. पॅंक्हर्स्टची पत्नी या नात्यानें एमेलिननें आपलं पुढलं सर्व आयुष्य घालविलं तें अतिशय समाधानांत घालविलं. दोन मुलगे व तीन मुली अशा अपत्यांचं तिनें संगोपन केलें; आणि डॉ. पॅंक्हर्स्टच्या मजूरविषयक चळवळींचा पुरस्कार यथाशक्ति केला.

डॉक्टर पॅंक्हर्स्ट यांच्या अंगीं त्यावेळच्या मानानें बरंच जहाल समाजवादी वारं होतं यांत संदेह नाहीं. विवाहानंतर कांहीं दिवस या दांपत्यानें एमेलिनच्या वडिलांच्या घरीं आगमन केलें; पण एमेलिनच्या वडिलांना जेव्हां जांवईबुवांचा कडवा समाजवाद असह्य झाला व तिचा निवडणुकींतील पराभव टाळण्याइतपत व्यवहारी शहाणपणाहि त्यांच्या अंगीं नाहीं असं जेव्हां त्यांना वाटलं तेव्हां त्यांनीं डॉ. पॅंक्हर्स्टवर टीकास्त्र झोडलं. या टीकेला एकच स्वाभिमानी उत्तर शक्य होतं. तें डॉ. पॅंक्हर्स्टनीं दिलं. त्यांनीं लगेच सासऱ्याचं घर सोडलं. आणि घरांतून जातांना मुलीनें बापाला पुढें केव्हांना केव्हांतरी हुंड्याच्या रकमेची भरपाई करण्याबद्दलच्या त्यांच्या वचनाची आठवण करून दिली. तेव्हां बापानें आपण त्या घरचे नाहीं म्हणून कानावर हात ठेवले. त्यानंतर पुन्हां सबंध जन्मांत मिसेस् पॅंक्हर्स्टनें बापाबरोबर भाषण केलं नाहीं.

डॉ. पॅंक्हर्स्ट यांच्या अंगीं ध्येयवादासाठीं स्वार्थाची होळी करण्याइतकी निष्ठाहि होती. वास्तविक त्यांच्या वास्तव्यस्थानाशेजारीं असलेल्या मर्सी नदींत शहराची सर्व घाण वाहूं देण्याला संमति देऊन जर ते मोकळे झाले असते तर त्यांचें घर श्रीमंतीनें नटलं असतं; आणि त्यांच्या निधनानंतर मिसेस् पॅंक्हर्स्टवर कुटुंबपोषणार्थ सक्तीनें कांहीं ना कांहीं उद्योग करण्याचा प्रसंग ओढवलाच नसता. अर्थातच अशा दारिद्र्याबद्दल मिसेस् पॅंक्हर्स्टला उत्कट अभिमान वाटणं अपेक्षितच होतं.

तरीही पूर्णपणें मिसेस् पॅंक्हर्स्टच्या अंगच्या झुंझारपणाचा पुरा उगम आपल्याला सांपडला असं आपणास वाटत नाहीं. आजोबांच्या अंगच्या क्रांतिकारकत्वाला, वडिलांच्या अंगच्या मानवताप्रेमी वृत्तीला, नोमीच्या वडिलांच्या अंगच्या बंडखोरीला, डॉ. पॅंक्हर्स्टच्या समाजवादी सौजन्ययुक्त वृत्तीला, मिसेस् पॅंक्हर्स्टच्या स्वभावाची घडण ठरविण्यांत योग्य तें स्थान देऊनही, तिच्या अंगच्या इतर पैलूंची ओळख नीटपणें करून घेण्याची आवश्यकता शिल्लक राहतेच.

मिसेस् पॅंक्हर्स्ट या बाई कांहीं बुद्धिमान् किंवा हुषार स्त्रीचा नमुना नव्हे. मनोवृत्तीनें त्या भोळ्या होत्या म्हटलं तरी चालेल. कसलीहि चमत्कारमय गोष्ट त्यांना सहज खरी वाटे. समजुतीनें देखील पुष्कळ बाबतींत त्या अडाणी ठरण्याजोग्या होत्या. मोकळ्या हवेंत फिरायला जाणं हें थोतांड आहे असं त्यांना वाटे. इतकंच काय पण आपल्या धाकट्या मुलाचे डोळे अधू आहेत आणि त्याला चष्मा पाहिजे हें देखील त्यांना पटत नव्हतं. चष्मा म्हणजे नटवेपणा आहे किंवा निदान मुलांची दृष्टि तर आपोआपच सुधारली पाहिजे असा कांहीं त्यांचा ग्रह होता कीं काय कळत नाहीं ! असल्या समजुतीनें धाकट्या मुलाचे डोळे किती बिघडले असतील त्याची आपणच कल्पना करावी. शिक्षणाविषयींदेखील त्यांचं मत वेगळंच होतं. आपल्या मुलांनीं शाळा चुकविली तर त्याबद्दल त्यांना कांहींच वाटत नसे ! उलट इजिप्शियन कला कशी होती या विषयींचं लोकविलक्षण असं शिक्षण मुलींना देण्याचा त्यांचा आग्रह मात्र अतोनात ! या शिक्षणविषयक औदासीन्याच्या बुडाशीं दुसरंही कारण असण्याची








शक्यता आहे. त्या वेळीं इंग्लंडांतल्या शाळांमधून अशा चळवळ्या पालकांच्या मुलांमुलींची हेटाळणी सर्रास चालू असायची! वरून उदारमतवादित्वाचा बुरखा पांघरणाऱ्या या मनोवृत्तीमुळें कांहीं शिक्षिकांची नोकरी, केवळ त्यांचे वडील पूर्वीच्या चार्टिस्ट पंथाचे होते अशी माहिती त्या वडिलांच्या निधनानंतर तीस वर्षांनीं जरी लागली, तरी खलास व्हायची! अशा एका शिक्षिकेला परत नोकरीवर घेण्याच्या कामीं प्रत्यक्ष मिसेस् पॅंक्हर्स्टनाच शब्द खर्च करावा लागला! असल्या शिक्षणपद्धतीबद्दल आणि शिक्षणखात्याबद्दल मिसेस् पॅंक्हर्स्टला तिटकारा न वाटणं हेंच नवल म्हटलं पाहिजे.

शिक्षणाचा तिटकारा किंवा 'लकडीशिवाय मकडी वळायची नाहीं' असल्या इतर समजुतींचं कारण मिसेस् पॅंक्हर्स्टची आई ही 'मॅंक्स वुमन' (Manx-woman) होती हें असण्याचा खूप संभव आहे. Manxwoman म्हणजे इंग्लंडच्या अगदीं पलीकडं असलेलं Isle of Man नांवाचं जें किंचित् असंस्कृत बेट, तेथील स्त्री. नाहींतर मिसेस् पॅंकहर्स्टसारख्या पुरोगामी आणि स्वतःच्या हक्कांविषयीं जागरूक असणाऱ्या स्त्रीमध्यें एरव्हीं पहिल्या चार्ल्स राजाविषयींचा उत्कट अभिमान कुठून यावा? पहिल्या चार्ल्सला तर लोकांनीं त्याच्या जुलमीपणामुळं आणि जनताद्रोहामुळं शिरश्छेदाची शिक्षा दिलेली होती. पण मिसेस् पॅंक्हर्स्टला पहिल्या चार्ल्सबद्दल विलक्षण प्रीति होती. किंबहुना जे जे सत्ताधारी होते पण ज्यांनीं आपली सत्ता सोडली होती किंवा गमाविली होती अशा व्यक्तींबद्दल मिसेस् पॅंक्हर्स्टला फारच आपुलकी वाटे.

शिक्षणांत देखील, आधुनिक शिक्षणशास्त्राचा गंधहि नसतांना, अन्तःप्रेरणेवर अनुसरून मिसेस् पॅंक्हर्स्टनीं नृत्यकलेला जें महत्त्व दिलं होतं तें या निराळ्या अर्थाच्या 'अशिक्षितपटुत्वा'मुळंच. माणूस हा सुसंस्कृत होणारा प्राणी आहे या कल्पनेंतील 'तो प्राणी आहे' या भागाला जेवढं महत्त्व दिलं गेलं पाहिजे तेवढं दिलं जात नाहीं असं अजूनहि एकंदर शिक्षणक्रमाबद्दल म्हणतां येण्यासारखं आहे. ज्या संस्कारामुळें माणसाच्या कोमल वा दांडग्या दोन्हीहि अन्तःप्रवृत्ती विकसित होत नाहींत तें शिक्षण वरपांगीं असून कमकुवतपणाचं ठरतं हें टागोरांनीं देखील ओळखलं होतं. आपल्या खिस्ताबेल या मुलीला नृत्यकला उत्तम येत असूनसुद्धां ती पुढें नृत्यकला शिकायला नाराज होती याबद्दल मिसेस् पॅंक्हर्स्टनं जें आकांडतांडव केलं त्यावरून गैरसमज करून घेण्याचं कारण नाहीं. उलट, या जोमदार अन्तःप्रवृत्तींना योग्य स्थान देण्याच्या तिच्या प्रयत्नांतच तिच्या पुढारीपणाचं खरं बीज आढळूं शकेल.

आणखी कांहीं क्षोभकारक अनुभवांमुळेंहि स्त्रीस्वातंत्र्याची चळवळ इतक्या लढाऊपणानें चालविण्याची स्फूर्ति मिसेस् पॅंक्हर्स्टना झाली. त्यांपैकीं डॉ. पॅंक्हर्स्ट यांच्या स्मारकाचा अनुभव अत्यंत उद्वेगजनक होता. वास्तविक ज्या इंडिपेंडंट लेबर पार्टीसाठीं अहर्निश डॉ. पॅंक्हर्स्ट व त्यांच्या पत्नी झटत होत्या त्या पार्टीच्या स्थानिक शाखेनें डॉ. पॅंक्हर्स्ट यांच्या स्मारकाच्या इमारतींत स्वतःची मुख्य कचेरी न्यावी आणि त्यांत स्त्रियांना प्रवेश देऊं नये हा आघात फारच मोठा होता. डॉ. पॅंक्हर्स्ट वारल्यावर लोकांनीं स्वयंस्फूर्तीनें फंड जमा करून मिसेस् पॅंक्हर्स्टच्या मुलांचं उच्च शिक्षण व्हावं म्हणून खटपट केली. पण फंड जमा करणाऱ्या गरीब माणसांना जें शिक्षण स्वतःच्या मुलांना देतां येणं शक्य नव्हतं, तें त्यांच्या पैशांतून आपल्या मुलांना मिळावं या कल्पनेचा अंगीकार मिसेस् पॅंक्हर्स्टनीं मुळींच केला नाहीं. उलट, त्या पैशांतून डॉ. पॅंक्हर्स्ट-स्मारक बांधलं जावं अशी त्यांनीं स्वतःच सूचना केली. असें असतांहि त्या स्मारकाच्या इमारतींत स्त्रियांना कसलंच स्थान असूं नये असें म्हणणाऱ्यांच्या वृत्तीला काय म्हणावं? अर्थात् जे मजूर-पक्षाचे सभासद होते किंवा समाजवादी म्हणविणारे होते त्यांची स्त्रीविषयक भूमिका तरी कोणती आहे हें बारकाईनें तपासण्याची गरज होती. ती भूमिका अगदींच तांत्रिक पाठिंब्याची होती हें जेव्हां मिसेस् पॅंक्हर्स्टनां कळलं त्याबरोबर त्यांनीं १९०३ सालीं ऑक्टोबर दहा तारखेला स्वतःच्याच दिवाणखान्यांत स्त्रियांच्या राजकीय व सामाजिक संघटनेची प्राणप्रतिष्ठा केली. या स्मारकप्रकरणानें मिसेस् पॅंक्हर्स्टच्या मनांत एकंदर पुरुषजातीविषयीं जरी चीड आली नाहीं तरी तिच्या अंगीं उत्कटत्वानें वास करीत असलेल्या पुरुषसत्ताविरोधी वृत्तीची धार फारच तीक्ष्ण झाली. अशा स्थितींत इंग्लंडांतील जनमतानें जेव्हां स्त्रीस्वातं-








## स्त्रियांना मतदानाचा हक्क मिळवून देणाऱ्या मिसेस् पॅंक्हर्स्ट

ऱ्याच्या चळवळीचा उपहास आरंभला व उदारमत-वादी म्हणविणाऱ्या सरकारानें जेव्हां कठोर शिक्षा देण्याचा अवलंब केला तेव्हां तर या झुंजार स्त्रीचा आवेश अधिकच उग्र झाला. आज ज्या पुरोगामी इंग्रजी समाजाचें गुणगान आपण करीत आहोंत त्याच समाजानें आणि त्यांतील बहुसंख्य वृत्तपत्रांनीं कधीं ठराविक सनातनी वळणाची कुचेष्टा करून "स्त्रियांना सार्व-जनिक जीवनांत पदार्पण करणें अशक्य आहे; त्यांनीं स्वतःचें क्षेत्र चूल आणि मूल एवढेंच मानणें हेंच योग्य आहे" अशी हाकाटी केली ! एका सभेमध्यें तर एका वक्त्यानें असे तारे तोडले कीं, 'मित्रहो, कल्पना करा आपल्या स्त्री-फडणीस अगदीं राष्ट्रीय बजेट तयार करीत आहेत; आणि एवढ्यांत त्यांचा प्रसूतिसमय आला ! तर मग— !' इतरांनीं इतक्या आंबट बुरसटपणाऐवजीं "ही वेळ अनुकूल नव्हे; इतर प्रश्नांची तीव्रता यापेक्षाहि अधिक आहे" असें म्हणण्यापली-कडे फारसें कांहीं केलें नाहीं. असल्या पुरुषी बेअकली-पणामुळेंच मिसेस् पॅंक्हर्स्टच्या नेतृत्वाखालीं चाललेल्या चळवळीला खवळलेल्या सागराचें स्वरूप प्राप्त झालें. त्या चळवळीनें टपाल जाळलें, रिकाम्या घरांना आगी लावल्या, सभा उधळल्या ! कांहीं नाहीं तर मालमत्तेची नासधूस करायची, अगदीं कांहीं नाहीं तर निदान घराचीं किंवा दुकानाची तावदानें तरी हातोड्यानें फोडायचीं असा प्रकार सुरू झाला ! आणि तुरुंगांत घातलें कीं अन्नसत्याग्रह ! या नासधुशीच्या कार्यक्रमांतला प्रभावीपणा मिसेस् पॅंक्हर्स्टला विशेष रीत्या कां पटला होता हें सांगणें कठीण आहे. पण तिला हुंड्याच्या रूपानें जी मालमत्ता किंवा रक्कम मिळणार होती तिला तिच्या वडिलांनीं खो घातला होता यामुळें म्हणा किंवा स्वतःच्या इतरही अनुभवांमुळें तिच्या मनांत हा संस्कार झाला असला पाहिजे कीं माणसांची कांहींतरी प्रत्यक्ष माल-मत्तेची नुकसानी घडल्याखेरीज त्यांच्या उदारवचनांची किंवा सद्बुद्धीची टोंचणी त्यांना खऱ्या रीतीनें कार्यप्रवण करीत नाहीं ! सभांमधून जेव्हां प्रवेश मिळेनासा झाला तेव्हां खिडक्यांतून, धुराड्यांतून गोंगाट माजविण्याचा स्त्रियांनीं प्रयत्न केला, तुरुंग भरले, अन्नसत्याग्रह केले. सक्तीनें अन्न घालण्यांत आलें तरी तें ओकून पाडलं, इतकेंच नाहीं तर आपल्या अंगावर रोमांच उभे राहातील अशा प्रकारचं प्रचंड दिव्य म्हणजे रेसकोर्सच्या मैदानावरील चंगीभंगी प्रेक्षकांचीं मनें या ज्वलंत प्रश्नाभोंवतीं वेधून घेण्यासाठीं भरधांव वेगानें जाणाऱ्या रेसच्या घोड्यांच्या टापांखालीं स्वतःचें आनंदानें बलिदान केलं ! एमिली वाइल्डिंग डेव्हिड्सन या उमद्या स्त्रीनं घोड्याच्या टापाखालीं स्वतःचं बलिदान केलं तेव्हां लंडनच्या रस्त्यावरून तिचं प्रेत किती विलक्षण गंभीर-पणानें आणि आंत धुमसणाऱ्या संतापानें मिरवीत नेलं असेल याची कल्पना आपल्या स्वातंत्र्यसंग्रामांतील अशा बिनमोल बलिदानांच्या प्रसंगावरून आपणां सर्वांना करतां येईल. त्यावेळीं तर मिसेस् पॅंक्हर्स्ट या रुग्णालयांत होत्या. मिरवणुकीची ही शोकजनक हकीकत समजल्यानंतर त्यांच्यानें राहवेना. त्या मिर-वणुकींत त्याही सामील झाल्या; आणि त्यांना पुन्हा कायदेभंगाबद्दल अटक झाली. अशा विलक्षण बेडर-पणानें, पोलादी शिस्तीनें मिसेस् पॅंक्हर्स्टनें स्त्रीचळ-वळीचें हें नेतृत्व अकरा वर्षें स्वतःच्या अशक्त प्रकृतींत, वयाच्या उतरत्या अवस्थेंत केलें. पोलिसांनीं आणि लोकांनींही या स्त्रीचळवळीवर कमी अत्याचार केले असं मुळींच नाहीं. कित्येक स्त्रियांना अशा स्वरूपाचे पोलिसी मार सहन करावे लागले होते कीं वर्षानुवर्षे त्यांची ती शारीरिक व्यथा नीट झाली नाहीं. लढ्याच्या 'मरेन किंवा मारीन' अशा अवस्थेंत अतिशय खडतर प्रसंग मिसेस् पॅंक्हर्स्टवर आले. आधींच त्यांचा एक मुलगा फ्रॅंक हा वारला होता. आतां हॅरी या मुलाला हल्लींचा पोलिओ हा रोग झाला. त्याच्या औषधो-पचाराला पैसे जमा करण्यासाठीं म्हणून मिसेस् पॅंक्ह-र्स्टनें अमेरिकेचा दौरा काढून भाषणं केलीं. पण त्या दौऱ्यावरून परत येतात तोंच कांहीं दिवसांनीं तो मुलगा वारला. पेथिक लॅरेन्स व त्यांची पत्नी यांनीं मिसेस् पॅंक्ह-र्स्टच्या कार्याशीं समरसता दाखविल्यामुळें त्यांना नऊ महिन्याची शिक्षा झाली होती. त्यांनीं अन्नसत्याग्रह करुन दाखविला होता. पण पुढें मतभेद झाले असतां त्यांना देखील स्वतःच्या पक्षांतून काढून टाकण्याचा करारीपणा आणि प्रखरपणा अखेरीअखेरीला तिनें दाखविला.

आणि एवढ्यांत महायुद्ध सुरू झालें ! फ्रेंच सहवा-साचा परिणाम म्हणून म्हणा किंवा इतर कशाचा म्हणा, मिसेस् पॅंक्हर्स्टनें तावडतोब चळवळ स्थगित केली; आणि पक्षाचं विसर्जनहि केलं ! दरम्यान शांतता-



अनुक्रमणिका

मय रीतीनं स्त्रीप्रश्नाविषयीं जितकी जागृति करतां येईल तेवढी करण्याची शिकस्त सर्वच बाजूंनीं चालली होती. अखेर १९१७ च्या विजयानें मिसेस् पँक्हर्स्टच्या प्रदीर्घ कार्यावर मंगल शिखर चढलं; आणि त्याचा अखेरचा कळस म्हणजे ॲस्क्विथनें ३० वर्षांच्या वरील स्त्रियांना जो हक्क १९१८ त दिला तो बाल्डविननें १९२८ मध्यें मिसेस् पँक्हर्स्ट इहलोक सोडून जाण्याच्या आधींच कांहीं दिवस, २१ वर्षांवरील सर्व स्त्रियांना दिला.

आपल्या आवडीप्रमाणें जीवित घालवावयाची सुसंधि पँक्हर्स्टबाईंना मिळाली असती तर त्यांनीं मैत्रिणींना बोलावून चहापार्टी देण्यांतच बहुतेक वेळ घालविला असता, क्वचित् नृत्याचे धडे घेतले असते आणि दिलेही असते; पण आयुष्याला कोणत्या मार्गांनीं कलाटणी मिळते याचा कांहीं नियम सांगतां येत नाहीं हेंच खरं ! एकंदर मिसेस् पँक्हर्स्टचं जीवितकार्य पाहिल्यानंतर जर कुणाला तिचं व्यक्तिचित्र प्रतिनिधिक पद्धतीनें रेखाटण्याची इच्छा झाली तर तो, या दृढनिश्चयदर्शक चौकोनी हनुवटीच्या एका सामान्य स्त्रीनं १९०५ सालीं पार्लमेंटांत मुख्य प्रधानाला एक पुढारी दुसऱ्या पुढाऱ्याला जणूं लिहितो आहे अशा आविर्भावांत पत्र लिहिण्याच्या वेळीं जी निश्चयी दृष्टि आपल्या इतर स्त्रीप्रेक्षकांकडे टाकली व त्यांतून जो अग्निस्फुलिंग निघाला, तो चित्रित करण्याची पराकाष्ठा करील !

---

## हृन्मंदिर मंगलसें पाहुनिया मी आलें— !

हृन्मंदिर मंगलसें
पाहुनिया मी आलें
स्नेहाचा कळस वरी
ध्येयाचा ध्वज डोले
दीपमाळ जागविते
भावांच्या मधुज्योती
दारींच्या वृक्षलता
प्रीतीनें पालवती
घंटारव भावधीर
साद जिवा घालतसे
पाहुनिया मी आलें
हृन्मंदिर मंगलसें
हृदयींची पाजळली
भावनिरंजन ज्योति
हृदयींची जागविली
शतजन्मांतिल प्रीति
शतजन्मांतील आतां
शाप इथें सरतील
शतजन्मांतिल आतां
ताप इथें निवतील
जीवन अभिषेकाला
मन माझें आसवलें
प्राणांनीं प्राणेशा
पूजाया मी सजलें
दारांतुनि आंत रिघे
मी कोठें ? अंधारीं
घुमतें कां मंदिर हें
घुबडांच्या घूत्कारीं ?
मूर्तिपुढें तडफडतें
कोणाचें बलिदान ?
मूर्ति कुठें, काळा हा
एक खडा पाषाण
हें पिशाच्च बडवितसे
घंटेचे हो टोले
–हृन्मंदिर मंगलसें
पाहुनिया मी आलें !

—देवदत्त दाभोलकर

[ Charlottee Mew च्या " I have been through the gates " या कवितेचा अनुवाद ].








प्रा. राम जोशी

# आर्थिक नियोजन आणि पक्षपद्धति

सांप्रत आर्थिक नियोजनाला फार महत्त्व प्राप्त झालें आहे. नियोजनावांचून आर्थिक उन्नति अशक्य आहे याची जाणीव सर्व देशांतील सरकारांना होत आहे; आणि त्यामुळेंच प्रगत तसेंच अप्रगत देशांत आर्थिक विकासाच्या योजना आंखल्या जात आहेत. १९१७ च्या कम्युनिस्ट क्रांतीनंतर आर्थिक नियोजनाच्या साहाय्यानें रशियानें जी अवाढव्य प्रगति केली, तिच्यामुळें तर अर्थव्यवस्था योजनाबद्ध असली पाहिजे या विचारसरणीस बरीच पुष्टि मिळाली आहे. व्यक्तिसाहसावर आधारलेल्या अनिर्बंध अर्थव्यवस्थेचें युग संपल्याची जाणीव आतां जवळजवळ सर्वांनाच पटली आहे असें नाहीं. सामाजिक उत्क्रांतीच्या अशा टप्प्यावर आपण उभे आहोंत कीं पूर्वजांच्या स्वप्नांतहि आलें नसेल इतक्या आपल्या जीवनाच्या कक्षा विशाल व त्याचें स्वरूप विविध बनलें आहे; समाजजीवन गुंतागुंतीचें व परस्परावलंबी झालें आहे; मन मानेल तसें वागणें ही स्वातंत्र्याची व्याख्या अर्थशून्य व धोक्याची बनली आहे. समाज करून राहणें ही मानवाच्या सुसंस्कृत जीवनाची नेहमींची गरज आहे. पण आज हें परस्परावलंबित्व इतकें वाढलें आहे कीं सामाजिक घटकांचे परस्परसंबंध योजनापूर्वक आंखल्या-शिवाय गत्यंतरच उरलेलें नाहीं.

औद्योगिक क्रांतीपासून जी एक आर्थिक व सामाजिक प्रक्रिया सुरू झाली, तिचा अपरिहार्य परिणाम म्हणजे अनिर्बंध अर्थव्यवस्थेचा अंत व योजनाबद्ध अर्थव्यवस्थेची आवश्यकता हा होय. योजना भिन्न-भिन्न प्रकारच्या असूं शकतील; त्यांची प्रेरक शक्ति, उद्दिष्टें व तपशील भिन्न असूं शकतील. पण नियोजनाचा संपूर्ण अभाव असलेली अर्थव्यवस्था आज दृष्टीस पडणें अशक्यप्राय झालें आहे.

## नियोजन व लोकशाही

नियोजनाची विचारसरणी अशा रीतीनें जसजशी दृढमूल होत गेली तसतसे तदनुषंगिक अनेक प्रश्न उपस्थित झाले. पण त्या सर्वांकडे अद्याप जावें तसें लक्ष गेलेलें नाहीं. नियोजनामुळें आर्थिक क्षेत्रांत निर्माण झालेल्या प्रश्नांसंबंधीं जितका ऊहापोह विचारवंतांनीं केला तितका राजकीय, व्यक्तिस्वातंत्र्यविषक व सामाजिक प्रश्नांविषयीं केल्याचें दिसत नाहीं. ज्या दोन ( रशिया व जपान ) राष्ट्रांत आर्थिक विकास झपाट्यानें झाला, तीं दोन्हीं लोकशाही-विरोधी राष्ट्रें होतीं. या ऐतिहासिक घटनेचाहि परिणाम झाला व आर्थिक नियोजन हें लोकशाहीविरोधीच असतें वा असलें पाहिजे अशी समजूत प्रसृत होऊं लागली. लोकशाही-विरुद्ध-आर्थिक नियोजन असेच पक्ष पडले व विचारवंतांनीं आपल्या विचारप्रणालीनुसार वा मूल्यानुसार यांतील पक्ष उचलून धरला. त्यामुळें लोकशाही आणि आर्थिक नियोजन असा पक्ष मांडणाऱ्या लोकांच्या पुढें दोहोंच्या स्वरूपाचा अभ्यास करून तीं एकत्र नांदू शकतील कीं नाहीं याचा विचार करण्याची जबाबदारी पडते. 'आर्थिक नियोजन यशस्वी करण्याकरितां सत्तेच्या केंद्रीकरणाची जरूर असते; खरी लोकशाही व नियोजन हीं परस्परविरोधी आहेत; विरोधावर आधारलेल्या पक्षीय लोकशाहीच्या चौकटींत नियोजन यशस्वी होऊं शकणार नाहीं' असें मत मांडण्यांत येतें.

या मतामागील भूमिका थोडक्यांत अशी मांडतां येईल:– आर्थिक नियोजनाचा कार्यक्रम दीर्घ मुदतीचा असतो. तो परिणामकारणक व्हावा याकरितां त्यांत सातत्य असण्याची गरज आहे.[1]

---

1 " The new reform policy cannot be a hit-or-miss compromise on disconnected issues but concerns the whole of society. Five or ten year plans, demanding prior agreement not only on the starting point but on the subsequent steps, have become the pattern of social change " — Karl Manheim-' Freedom, Power and Democratic Planning '. p. 34.

सातत्य ही नियोजनाची निकड आहे. पण बदल ही लोकशाहीची गरज आहे. या परस्परविरोधी तत्त्वांची सुसंगति कशी लावावयाची हाच नियोजन व पक्षीय लोकशाहीसंबंधींच्या प्रश्नाचा अर्थ आहे. बार्बारा वूटन यांनीं हा पेंच पुढील शब्दांत वर्णन केला आहे: "The dilemma that we have to solve here is that economic planning demands *continuity*, and political democracy seems to imply *instability*. Nothing can alter the fact that we cannot both make effective long-term plans and continually exercise the right to change our minds about anything at any time "[2]

अशा रीतीनें लोकशाही टिकवून नियोजनाचा कार्यक्रम हातीं घेणें कठीण किंवा अशक्य आहे असें वाटून अनेक विद्वानांनीं नियोजनाचा पक्ष उचलून धरला व त्याकरितां सत्तेच्या केंद्रीकरणाची आवश्यकता प्रतिपादिली. कम्युनिस्ट व नाझी राज्यकर्त्यांनीं उघड-उघड लोकशाहीविरोधी भूमिका घेतली व केंद्रीभूत सत्तेमार्फत सर्वंकष नियोजन करण्यास सुरवात केली. नियोजनाच्या काळांत जनतेकडून ज्या कष्टांची व त्यागांची गरज असते ते कष्ट व त्याग एकसंध व एकजिनसी लोकमताशिवाय शक्य नाहींत, म्हणून सर्व सत्ता एकाच पक्षाच्या हातांत केंद्रित करून त्यानें स्वतःला अनुकूल असें लोकमत तयार करावें हा विचार पुढें आला. कार्ल मॅनहीम आपल्या पुस्तकांत म्हणतात: "There is a certain affinity between the idea of planning and the one-party system. Since the formation and execution of a consistent plan requires a unified political will, the totalitarian systems for all their crudeness contain an element related to the historical situation today."

## लोकशाहीवरील आक्षेप

रशिया, जर्मनी व जपान या देशांतील आर्थिक नियोजनाकडे पाहिलें असतां वरील विधानांत सत्यांश असल्याचें आढळून येईल. आर्थिक विकास हुकुमशाहीच्या वातावरणांत झपाट्यानें होतो हें विधान सर्वथैव खरें नसलें तरी बऱ्याच अंशीं खरें आहे. परंतु अशा नियोजनाच्या यशासाठीं मानवी स्वातंत्र्याची जी जबरदस्त किंमत द्यावी लागते ती देण्यास कोणताहि लोकशाहीवादी मनुष्य तयार होणार नाहीं. म्हणून त्याला पर्याय म्हणून असें सांगण्यांत येतें कीं, नियोजनाचा प्रयोग लोकशाहीच्या चौकटींत झाला पाहिजे व तसा तो होईल तर जनतेला आपलीं स्वातंत्र्यें अबाधित राखून आर्थिक उत्कर्ष गांठतां येईल. पण लोकशाहीच्या बैठकीवर आधारलेल्या समाजांत आर्थिक नियोजन झपाट्यानें झाल्याचा निर्विवाद पुरावा नाहीं. नियोजनाच्या गरजा व लोकशाहीच्या प्रेरणा यांच्यांतील संघर्ष टाळण्याचा प्रभावी मार्ग अद्याप पाश्चात्त्य लोकशाहीला दाखवितां आलेला नाहीं. नियोजनाच्या बाजूनें लोकशाहीवर आक्षेप घेणारांचें म्हणणें असें कीं पक्षाभिनिवेश अथवा पक्षांधता व विरोधासाठीं विरोध करण्याचा मोह पक्षपद्धतींत अनिवार्य आहे. त्यामुळें राष्ट्रीय पुनर्निर्मितीच्या कार्यालाहि बेजबाबदार व अकरणात्मक विरोध होऊं लागतो; सत्ताधारी पक्षानें जें जें योजावें तें तें वाईट व जनहितविरोधी असा प्रचार होऊं लागतो व तो बहुतकरून अतिरेकी स्वरूपाचा असतो. अशा प्रचाराला तोंड देत जनतेचें सहकार्य नियोजनाला प्राप्त करून देणें सत्ताधारी पक्षास जवळजवळ अशक्य होतें. लोकांचा बुद्धिभेद झाल्यानें सुजाण सहकार्य मिळत नाहीं व त्यामुळें नियोजन अयशस्वी होतें व शास्ता पक्ष बदनाम होतो. लोकांनीं दुसरा पक्ष निवडला तरी परिस्थिति फारशी सुधारत नाहीं, कारण विरोधाचा तोच खेळ पुढें चालू राहातो. अशा परिस्थितींत विरोधावर व मंत्रिमंडळांतील बदलाच्या तत्त्वांवर उभारलेली लोकशाहीची चौकट आर्थिक नियोजनास उपयोगी न पडतां उलट अपकारक ठरते. विविध पक्षांमध्यें मूलभूत तत्त्वांबद्दल एकमत असेल व मतभेद फक्त तपशीलाबाबत असेल तर सत्तेच्या खांदेपालटानें

2. Barbara Wootton-'Freedom under Planning,' p. 117.








नियोजनाच्या कार्यक्रमांत खंड पडण्याचें कारण नाहीं. पण आधुनिक राजकीय पक्षांमधले भेद तपशीलाचे नसून समाजाच्या संघटनेविषयींच्या मूलभूत तत्त्वासंबंधींचे असल्यानें सरकारांतील बदल नियोजनाला मारक ठरतात.

लोकशाहीवरील हें आक्षेप उत्तर देण्यास कठीण आहेत हें एकदम कबूल केलें पाहिजे. पण त्याचबरोबर कोणतेंहि उत्तर संभवनीय नाहीं असा वैफल्याचा निःश्वास टाकण्यांतहि पुरुषार्थ नाहीं. लोकशाही सतत वर्धिष्णु आहे, सृजनशील आहे. तिच्या लवचिक चौकटीमध्यें नियोजन सामावून घेतां येणारच नाहीं असें नाहीं. पण त्याकरितां योजनेचें स्वरूप व लोकशाहीची परंपरागत कल्पना या दोन्हींमध्यें महत्त्वाचे बदल करावे लागतील. सातत्यपूर्ण अशा नियोजनासाठीं एकसंध लोकमताची जी गरज असते ती योग्य अशा सामाजिक व आर्थिक संस्थांमार्फत पूर्ण करणें अशक्य नाहीं. पण त्याकरितां लोकशाहीविषयींच्या परंपरागत कल्पना टाकून दिल्या पाहिजेत. विरोधकांचें कार्य केवळ विरोध करणें हें आहे (The business of the opposition is to oppose) या गृहीतकृत्यावर सनदशीर लोकशाहीची उभारणी झाली आहे. पण या नकारात्मक भूमिकेवर उभा राहून कोणताहि विरोधी पक्ष आपली जबाबदारी पार पडूं शकणार नाहीं. आजचा विरोधी पक्ष हा उद्यांचा संभाव्य सत्ताधारी पक्ष असल्यानें त्याला बेजबाबदार विरोधाची भूमिका घेऊन चालत नाहीं. युद्धासारख्या आणीबाणीच्या प्रसंगींच केवळ नव्हे तर एरव्हींसुद्धां अनेक बाबतींत सत्ताधारी व विरोधी पक्ष यांच्यांत साम्य आढळतें. समाजाचा विकास जसजसा अधिक, लोकशाही जसजशी परिणत, तसतसा विरोधावरचा भर कमी झालेला दिसून येतो. म्हणून आर्थिक नियोजन यशस्वी करावयाचें असेल तर समाजांतील विरोधी शक्तींनीं व पक्षांनीं परस्परसहकार्याचीं क्षेत्रें वाढवावींत हाच यावर उपाय आहे. अर्थात् यासाठीं सत्ताधारी पक्षानें पुढाकार घेऊन सहकार्याचा हात पुढें केल्याशिवाय अनुकूल वातावरण निर्माण होणार नाहीं. आर्थिक विकासाची योजना तयार करतांना, तिचीं उद्दिष्टें व तपशील ठरवितांना विरोधकांच्या मतांस मान देणें व त्यावर अंमलबजावणी होत असतांना पक्षीय स्वार्थाची दृष्टि न ठेवतां राष्ट्रीय हितच समोर ठेवलें गेलें पाहिजे. या सर्व दृष्टींनीं सत्ताधारी पक्षावरच सहकार्य मिळविण्याची व टिकविण्याची जबाबदारी येते हें लक्षांत येईल.

## पक्षविहीन लोकशाही व एकपक्षीय लोकशाही

पण याचा असा अर्थ मात्र होतां कामा नये कीं विरोधकांनीं केवळ सहकार्य करीत राहावयाचें. सहकार्याइतकीच टीकेची, विरोधाची व क्वचित् प्रसंगीं प्रत्यक्ष प्रतिकाराचीहि गरज लोकशाहीला भासते. जर दोन पक्षांत शंभर टक्के मतैक्य असेल तर त्यांच्या स्वतंत्र अस्तित्वाचें कारणच उरत नाहीं. याकरितां मतैक्याचीं क्षेत्रें शोधीत असतां विरोधाच्या मुद्द्यांवरहि लोकांचें लक्ष वेधावें लागतें. याकरितां विरोधी प्रचार व प्रसंगीं अनत्याचारी प्रतिकार हीं लोकशाहीं राजकारणांतील शास्त्रपूत शस्त्रें मानलीं गेलीं पाहिजेत. विरोधी पक्षांत केवळ पक्षहित असतें, राष्ट्रहित नाहीं हा समज लोकशाहीला मारक ठरणारा आहे. कोणताहि ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाचा पक्ष त्याला प्रतीत झालेल्या सामाजिक सत्याचाच कमीअधिक प्रमाणांत आविष्कार करण्याचा प्रयत्न करीत असतो. म्हणूनच विरोधकांची कदर करणें, त्यांच्याविषयीं केवळ सहिष्णुता न दाखवितां त्यांचें स्वागत करणें हीं लोकशाहीचीं अवश्य पथ्यें मानलीं जातात. नियोजनाचा स्वीकार केला म्हणून या मूलभूत तत्त्वाचा अव्हेर करण्याचें कारण नाहीं. नियोजनाच्या उद्दिष्टांबद्दल एकमत झालें तरी विरोधाचें कार्य संपत नाहीं. उलट तें वाढतें. अतिशय जागरूक राहून तपशीलाच्या असंख्य मुद्द्यांवर भिन्न मतप्रदर्शन करणें अत्यंत जरूरीचें आहे. म्हणून मतैक्याच्या क्षेत्रांत सहकार्य व विधायक टीका अशी दुहेरी भूमिका विरोधी पक्षास घ्यावी लागेल. याला प्रतियोगी सहकारिता असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. पक्षांपक्षांमधील मतभेद समझोत्यानें व सुसंस्कृत मार्गानें सोडविण्याचे प्रयत्न स्वागतार्हच समजले पाहिजेत. पण जेणेंकरून पक्षांचें वैशिष्ट्यच नष्ट होईल व सार्वजनिक मतैक्याचा आभास निर्माण होईल असे प्रयत्नहि लोकशाहीस मारकच ठरतील. प्रत्येक ऐतिहासिक पक्षास स्वतःचा तोंडवळा असतो. त्याचा वेगळेपणा टिकवून ठेवणें आवश्यक असतें. एकपक्षीय लोकशाही ही हुकूमशाहीच आहे हें विसरून चालणार नाहीं. पक्षविहीन लोकशाही व एकपक्षीय लोकशाही ह्या मूलतः भिन्न कल्पना आहेत.







पहिलींत पक्षपद्धतीचाच लोप कल्पिलेला आहे तर दुसरींत सत्तेची मक्तेदारी आहे; एकींत राजकारणाचा अस्त आहे; दुसरींत सर्वंकष हुकूमशाहीची पेरणी आहे. म्हणून सहाकार्याबद्दलचा उत्साह अमर्याद होऊन त्याचें रूपांतर एकपक्षीय सत्तेंत होणार नाहीं याची खबरदारी घेतली पाहिजे.

पक्षपद्धति राजकीय संघटनेची वा समाजव्यवस्थेची आदर्श अवस्था नाहीं हें पाश्चात्त्य लोकशाहीचा इतिहास माहीत असलेला कुणीहि विचारी मनुष्य मान्य करील. त्यांतील दोष स्पष्ट आहेत. पण आधुनिक युगांतील प्रचंड प्रश्नांचीं उत्तरें देत असतांना लोकमताची कदर करणाऱ्या व त्याच्याच कौलाप्रमाणें चालणाऱ्या पार्लमेंटरी लोकशाहीशिवाय दुसरी यंत्रणा मानवास अद्याप ज्ञात झालेली नाहीं. प्रचंड संख्येचे मानवसमूह शांतिपूर्ण मार्गानें कह्यांत ठेवून अधिकांचे हित साधण्याचा व तें हितहि शासनकर्त्यांनीं स्वतःच न ठरवितां लोकांना ठरवूं देण्याचा अधिकार शाबूत ठेवण्याचा दुसरा मार्ग जोंवर उपलब्ध झाला नाहीं, तोंवर राजकीय पक्षांची संघटना अपरिहार्य आहे; इतकेंच नव्हे तर पक्षसंघटनेचें कार्य हें लोकशाहीचेंच कार्य आहे. आर्थिक नियोजनानें पक्षांचें कार्य कमी होत नाहीं उलट वाढतें.

अशा रीतीनें आर्थिक नियोजन यशस्वी करण्यासाठीं पक्षपद्धति कायम राहिली तरी पक्षांच्या कार्यामध्यें महत्त्वाचे बदल होतील.[3] सत्तारूढ पक्षानें शासन करावें व विरोधी पक्षानें विरोध करावा अशी श्रमविभागणी करून आर्थिक विकास होऊं शकणार नाहीं. याकरितां शक्य तेथें मनमोकळें सहकार्य व आवश्यक तेथें विधायक विरोध व क्वचित् प्रसंगीं अनत्याचारी प्रतिकारहि विरोधी पक्षास अंगिकारावा लागेल.

## स्वायत्त संस्थांमार्फत अर्थव्यवथा

याच संदर्भांत आणखी एका महत्त्वाच्या संस्थात्मक बदलाचा विचार करावा लागेल. अर्थव्यवस्थेंतील वाढता भाग पक्षीय राजकारणापासून अलिप्त करून स्वतंत्र व स्वायत्त अशा संस्थांमार्फत त्याचा व्यवहार पहावयाचा ही ती पद्धत होय. इंग्लंडमध्यें पक्षीय स्पर्धेमुळें सार्वजनिक महत्त्वाच्या व्यवसायांतहि अस्थैर्य येतें व त्यामुळें समाजाचें फार नुकसान होतें हें ओळखून राज्यकर्त्यांनीं पब्लिक कार्पोरेशनन्सची पद्धत सुरू केली. लंडन पॅसेंजर्स ट्रॅन्स्पोर्ट, बी. बी. सी. व राष्ट्रीकृत धंद्यांचीं व्यवस्थापकमंडळें हीं इंग्लंडमधील अशी स्वायत्त कार्पोरेशन्स आहेत. अमेरिकेंतील सर्वांत मोठें उदाहरण म्हणजे टेनेसी व्हॅली ॲथॉरटी ( T.V.A ). अशा संस्थांचें जाळें शासनसंस्थेंभोंवतीं निर्माण करण्याचे दोन फायदे आहेत. एक म्हणजे राजकीय क्षेत्रांतील बदलांच्या अनिष्ट परिणामांपासून अर्थव्यवस्थेचा बचाव होतो व समाजांतील स्वयंस्फूर्त कर्तृत्वाच्या झऱ्यांचा शोध लागतो. क्रमाक्रमानें अर्थव्यवस्थेचा अधिकाधिक भाग अशा रीतीनें शासनसंस्थेच्या कक्षेंतून बाहेर काढला, तर राजकीय स्पर्धेंतलि तीव्रता खूपच कमी झाल्याशिवाय राहणार नाहीं. पक्षांना आलेलें अवास्तव महत्त्व हळूंहळूं कमी करण्याचा तोच एक प्रभावी मार्ग आहे. राजकीय पक्ष आणखी कित्येक वर्षें राहाणार असले, तरी खरी लोकशाही पक्षविहीन असावी हेंच ध्येय समोर ठेवून पक्षांचे व्यवहार झाले पाहिजेत. यासाठीं आर्थिक व राजकीय सत्तेचें विकेंद्रीकरण करावें लागेल, जनतेच्या स्वयंस्फूर्त अशा व्यावसायिक व सांस्कृतिक संघटना मजबूत कराव्या लागतील व दैनंदित कारभारांत त्यांचें प्रत्यक्ष सहकार्य मिळवावें लागेल. ‘ जनतेच्या संमतीवर आधारलेली ’ ही लोकशाहीची व्याख्या अपूर्ण आहे. त्यांतूनच प्रतिनिधिशाहीचा उगम झालेला आहे. म्हणून संमतीपेक्षां सहकार्य अधिक महत्त्वाचें मानलें गेलें पाहिजे. तें शक्य करण्याच्या दृष्टीनें अर्थव्यवहार व राज्यकारभार यांच्यांत फरक केला पाहिजे. नियोजनापासून उत्पन्न होणारा सत्ताकेंद्रीकरणाचा धोका टळेल कीं नाहीं हें विकेंद्रीकरण, लोकांचें सहकार्य व नियो-

3 “ The creative force of opposition must, under no circumstances, be suppressed. Constructive criticism will, if anything, become more important. But the channels through which it operates, the form in which it is presented and the time when it is aired may undergo a change ” —*Karl Manheim*— ‘ Freedom, Power and Democratic Planning ’, p. 35.









जनासंबंधीं जागृति ह्या तीन मुख्य गोष्टींवर अवलंबून आहे. नियोजन हें कधींच साध्य असूं शकत नाहीं. तें नेहमीं साधनच असतें. याकरितां नियोजन पक्षांमार्फत करण्याऐवजीं नियोजित विभाग राजकारणांतून दूर काढण्यानें फार मोठें कार्य होणार आहे.

सनदशीर लोकशाहीचा एक अवश्यमेव घटक असें स्थान आज जरी राजकीय पक्षांना प्राप्त झालें असलें तरी तें कायमचें राहील किंवा राहावें असें नाहीं. पण आज पक्षीय संघटनेची जबाबदारी टाळल्यानें पक्षविहीन लोकसत्ता अस्तित्वांत येणार नाहीं. त्याकरितां कित्येक वर्षें सहेतुकपणें योग्य अशा अर्थव्यवस्थेची, सांघिक जीवनाची उभारणी करावी लागेल. जसजसें राजकारणाचें क्षेत्र संकुचित होत जाईल, सांस्कृतिक व व्यावसायिक संघटना मजबूत होत जातील व सत्ता विकेन्द्रित होईल तसतसें क्रमाक्रमानें शासनसंस्थेचें दंडशक्ति म्हणून महत्त्व कमी होईल व दंडहीन समाज निर्माण होण्याची शक्यता निर्माण होईल. त्या वेळींच राजकीय पक्ष विरतील. साप जशी कात टाकून देतो तसा प्रगत व संघटित झालेला समाज पक्षांचा त्याग केल्याशिवाय राहाणार नाहीं.

---

## आळंदींत ज्ञानेश्वरा — !

आळंदीत ज्ञानेश्वरा
चाले पुण्याचा विकरा
तुझ्या नांवावर जमे
ढोंगी साधूचा पसारा.
आज तुझ्या समाधीला
वेढा ढोंगी पुजाऱ्यांचा
सौदा चाले आगळाच
पैशासाठीं लाचारीचा
सर्वस्व गा होमुनिया
ज्यानें निष्ठा नांदविली
त्याच्या समाधीच्या पुढें
लोलुपता बळावली
ज्ञानियाच्या राजा, तुझें
राज्य महाराष्ट्रीं नांदे
राजधानींत तुझिया
पैशालाच तेज चढे.
सोनें 'सोळा'च्या दरांत
देशील बा यांना जर
ज्ञानेश्वरीची तयांना
मुळींहि न मातबर
कंठरव त्यांचा कधी
ऐके एकदां जागून
त्यांच्या साध्या बोलांतहि
जिव्हाळयाचा पडे खून.
छान केलें ज्ञानदेवा
तुवा नांव कमविलें
आणि त्याच्या बळावर
यांचें आसन स्थिरलें.
मनीं होतें कांहीं न्यारें
भेटायचें एकान्तांत
भावफुलें वहायाचीं
कांक्षा होती या मनांत.
ज्ञानियाच्या राजा, तुला
सांगायचें होतें खूप
शब्द तसच राहिले
परतलों गुपचुप.
अनावर होऊनिया
आसूं निपटले देवा
ज्यांनीं हाल केले तुझे
त्यांचा तूंच झाला ठेवा.
चंदनाच्या लेपनांत
होवो तुझें सांतवन
परी अंतरांत माझ्या
डोंब पेटतो दारुण
कशाला हीं मंदिरें अन्
कशाला ही ढोंगी पूजा
महाराष्ट्रभूमींतून
तुझ्या नांवाचाच वाजा.
टाळ-मृदंगांत जेव्हां
भोळे रंगत घेतात
त्यांच्या भावगंगेंतून
व्हावें कोणीहि पुनीत !

— गणेश कुडे








प्रा. व. म. परांजपे

# ' माझे ज्योकाका '

[ जोसेफ स्टालिनसंबंधीं उपलब्ध असलेल्या साहित्यांत त्याचा पुतण्या बुदु स्वॅनिट्झे यानें लिहिलेल्या " My Uncle Joe " या पुस्तकाचें स्थान वैशिष्ट्यपूर्ण आहे. या पुस्तकांत स्टालिनचा राजकीय मुखवटा दूर झाला आहे, नेतृत्वामुळें व्यक्तिमत्त्वावर चढणारा रंग नाहींसा झाला आहे आणि त्याऐवजीं त्या मुखवट्याआड असलेल्या स्टालिनचें वैचारिक आणि भावनात्मक जीवन आणि त्यांत प्रकट होणारें त्याचें विशिष्ट व्यक्तिमत्त्व यांचा परिचय अनौपचारिक लेखनशैलीनें करून देण्यांत आला आहे.—प्रा. परांजपे यांनीं लिहिलेलें प्रस्तुतचें 'ज्योकाकां'चें व्यक्तिदर्शन या ग्रंथावरच आधारलेलें आहे.– का० सं० ]

' ज्यो 'काकाबद्दल आमच्या कुटुंबांत अनेक आख्यायिका प्रचलित होत्या. त्याच्याबद्दल आमचेकडे चांगलें मत होतें, तें दोन कारणांनीं. तो खूप शिकलेला आहे, याचें कौतुक आमच्या घरांतील बायकामंडळींना फार होतें. आणि जुलुमी रशियनांच्या दडपशाहीविरुद्ध लढा देणारा म्हणून सर्व जॉर्जिअन्स त्याला फार मानीत. त्यानें शिक्षण सुरळितपणें चालू ठेविलें असतें, तर तो चांगला धर्मगुरु झाला असता. आई सांगते कीं आमच्या कुटुंबांतील ग्रिगॉरी कुर्डिआनी या धर्मगुरूनें एकदां ' ज्यो ' काकाची, शाळा सोडल्याबद्दल, चांगली हजेरी घेतली होती. जवळजवळ तासभर त्यानें त्याला सुनाविलें. शेवटीं शांतपणें ' ज्यो 'काका विचारतोः " झालं ? संपलं सांगून ? माझं ऐक आतां. मी या नवीन मार्गाकडे वळलों, त्याचें कारण—खुद्द पोप आणि इतर श्रेष्ठ धर्माधिकारी यांनाच जीझसूच्या शिकवणुकीचा विसर पडला आहे. स्वतः निष्कांचन राहून दारिद्र्यानें पीडलेल्यांची सेवा करण्याचें व्रत त्यांनीं मनाआड केलें आहे. " ही वादावादी चांगली मध्यरात्रीपर्यंत चालली होती. पण त्यामुळें कटुता मात्र निर्माण झाली नाहीं. कारण शेवटीं ' ज्यो 'काकानें कुर्डिआनीला मिठी मारली आणि म्हणाला " सगळेच जर धर्मगुरु तुझ्यासारखे असते ना, तर मीसुद्धां धर्मगुरुच होणे पत्करिलें असतें ! " ...... दुसऱ्याचें बोलणें अत्यंत शांतपणें ऐकून घेऊन आपल्या मुद्द्यापासून रेसभरहि दूर न सरकणें, ही कला माझ्या काकाला फारच चांगली अवगत होती.

रशियन सत्तेविरुद्ध बंड पुकारणारा झुंजार वीर म्हणून सर्वांनाच त्याच्याबद्दल फार आदर वाटे. 'सिको' एकदां मला म्हणाला, " तुझा काका खरा वीर आहे बघ ! या रशियनांच्या तावडींतून देश मुक्त करण्याकरितां त्यानें उभा जन्म घालविला. सरकारनें याला तुरुंगांत डांबावें, आणि या स्वारीनें पळून जावें ! शेवटीं त्याची सैबेरियाला रवानगी झाली. पण तेथें स्वतः थंडीनें कांकडून मरण्याऐवजीं, पहारेकऱ्याला भोसकून हा पुन्हां परत ! पोलिस त्याच्या शोधांत आहेत. त्याचा ठावठिकाणा प्रत्येकाला माहीत आहे. पण त्याला पकडून देण्याचें पाप मात्र कोणीच करणार नाहीं. खुशाल उजळ माथ्यानें टाएफ्लिस व बाकूच्या रस्त्यांतून हा हिंडत असतो. फार काय, एकदां तर टाएफ्लिसला नृत्यगृहांतहि गेला, आणि गाणीं म्हणून आपल्या पक्षासाठीं त्यानें फंडहि जमा केला. "

' मॉस माएकेलॅंडझ् ' मात्र 'ज्यो'काकावर दुसऱ्याच एका कारणानें खूष आहे, आणि तें म्हणजे त्याची खाण्याची अचाट शक्ति. नाहींतरी आम्हां जॉर्जिअनांना या एका गुणाबद्दल जरा आदरच वाटतो. मोठ्या कौतुकानें मान हलवीत, ' ज्यो'काकानें सहज बसल्या बैठकीला सव्वा गॅलन दारू कशी रिचविली, याची मोठी रसभरित हकीगत त्यानें मला ऐकविली: " बरं, येवढ्यानें काय झालंय ? दारू चढणें तर राहोच. पण त्यावर आणखी मटन-सूपचीं चार भांडीं त्यानें स्वाहा केलीं ! वाहवारे पठ्ठे ! चांगलं नांव काढणार बघ तुझा काका. "








पण मध्यंतरीं त्याच्या आणि 'केकी' आत्याच्या प्रेमसंबंधामुळें, त्याच्याबद्दल जरा कुरबुर ऐकूं येऊं लागली. म्हणजे, त्याचीहि लग्न करण्याची इच्छा होती तिच्याबरोबर. पण लग्नसोहळ्यांत पोलिसच याला चतुर्भुज करतील अशी भीति वाटत होती. त्याच्या आईनें यांतून चांगला मार्ग काढला. घरांतला हा भ्रष्टाकार तिला बिलकूल सहन होण्यासारखा नव्हता. कुर्डियानील पौरोहित्य करावयास सांगून, घरांतच विवाह उरकून घेण्याचें तिनें ठरविलें. "आणि जर हा सावळागोंधळ असाच चालूं ठेवणार असशील, तर पुनः तुझें तोंडहि पहाणार नाहीं मी" असा भक्कम दमहि भरला त्याला! त्यामुळें मात्र, 'ज्यो'काका—अगदीं चर्चमध्यें जाऊन--लग्न करण्यास तयार झाला. "मग 'ओखराना'[१] का येईना पकडवॉरंट घेऊन" अशी पुस्ती जोडायलाहि त्यानें कमी केलें नाहीं.

अगदीं जवळून मी 'सोसो'[२]काकाला बघितलें तें त्याच्या लग्नसोहळ्याचे प्रसंगीं. त्याच्या त्या जाड जाड भुंवया, चित्त्यासारखे तेजस्वी आणि भेदक डोळे, अस्पष्ट दिसणारे तोंडावरचे देवीचे वण–यामुळें त्याची मुद्रा जरा उग्रच भासे. मला पाहिल्यावर तो एकदा मोकळेपणानें हंसला आणि म्हणाला, "मोठा पुंड दिसतोस रे! असेंच पाहिजे बाकी. मला उगीच 'इनामदारांचे बाळू' आवडत नाहींत."

'ज्यो' काकाचा आवाज मोठा गोड आहे, आणि तो गातोहि चांगलें, असें मी ऐकलें होतें. आणि खरंच, त्यादिवशी त्यानें एक अस्सल दर्दभरी प्रेमगीत आपल्या दिलखुलास आवाजांत गाऊन, आम्हांला अगदीं लुब्ध करून टाकलें. गाण्याच्या या तंद्रींतच, प्रिन्स मॅडवानीनें एका हातांत तलवार आणि दुसऱ्या हातांत खंजीर घेऊन स्वतःभोंवतीं एक गिरकी घेतली आणि खंजीर-नृत्यासाठीं सोसोकाकासमोर येऊन टाकला. चट्कन, जवळच्या माणसाकडून दोन खंजीर काकानें काढून घेतले–काकाच्या भेदक डोळ्यांतून तेजाचे जणुं स्फुलिंग बाहेर पडताहेत, नाकपुड्या थरथरत आहेत, केंसांची झुलपें कपाळावर रुळत आहेत, उजव्या हातांतला खंजीर उगारून, डाव्या हातांतल्या खंजीरानें मांडीवर नृत्याची लय धरली आहे–दोघे एकमेकांसमोर उभे राहिले, आणि डोळ्याचें पातें लवतें न लवतें तोंच डाव्या हातांतला खंजीर त्वेषानें उगारला गेला. – क्षणभर असेंच वाटलें कीं आतां मॅडवानीच्या छातीचा हा खंजीर भेद करून जाणार – तोंच, अगदीं ऐन भरांत काकानें आपला हात रोंखला, आणि मोठ्या डौलांत मान उडवून, झुलपें मागें सारून दिमाखांत उभा राहिला. आमच्यापैकीं एकजण बेहोष होऊन ओरडला: "वाहवा, एखाद्या 'ॲब्रेक'वरही ताण केलीस तूं." हे 'ॲब्रेक' कॉकेशस्‌मधले लुटारू होते. तसे ते थोडेफार देशभक्तहि होते. कारण त्यांच्या लुटीचा बराचसा हिस्सा झारच्या जुलमी राजवटीखालीं तुडवल्या गेलेल्या आपल्या देशबांधवांना ते वांटून टाकीत. 'ॲब्रेक' या शब्दाची जादू केवढी! त्या एकाच शब्दानें, माझ्या काकाचें मला एक नवदर्शनच घडविलें. ४७ वर्षें झालीं त्या प्रसंगाला. परंतु तें दृश्य माझ्या मनःपटलावर आजहि कोरलेलें आहे. त्याच्या आवाजाचे पडसाद अजूनहि माझ्या कानांत घुमत आहेत. दोन्हीं हातांत ते खंजीर तसेच पकडून तो खिडकीजवळ गेला, त्यानें एकदां बाहेर नजर टाकली आणि गर्जून म्हणाला "हो, मी ॲब्रेकच आहे आणि मला त्याचा अभिमानहि आहे.—आपण सारेच ॲब्रेक आहोंत. डोंगराच्या कडीपठारावरले आपण रांगडे गडी! इतर लोकांना गुलामींतून मुक्त करण्यासाठीं तर आपला जन्म. आज रशियन झारनें आपणांस गुलाम केलें आहे पण हाडाचा ॲब्रेक गुलामी कधींच मानणार नाहीं. दुसरा अलेक्झँडर झार म्हणत असे कीं 'कॉकेशस् हें राजमुकुटांतलें देदीप्यमान माणिक आहे.'......होय! पण या माणकावर लाली चढली आहे ती रक्ताची! पण एक दिवस असा उगवेल कीं या माणकाला झारशाही धुळीला मिळालेली बघण्याचें भाग्य लाभेल.'

"मी पण असाच काकासारखा झुंजार ॲब्रेक होणार" असें मी आईला म्हटल्यावर मात्र तिनें मला दोन सणसणीत लगावल्या आणि म्हणाली 'तूं एक मूर्ख, आणि तुझा काका सात मूर्ख'!

१९१३ च्या नोव्हेंबरमध्यें, मी सेंट–पीटर्सबर्गच्या विद्यापीठांत नांव दाखल केलें. आणि इतर अनेक जॉर्जिअन विद्यार्थ्यांप्रमाणें 'बोल्शेव्हिक' पक्षाचा सभासदहि झालों. थोड्यांच दिवसांनीं 'प्रवदा' या

---

१. ओखराना— त्यावेळचा एक पोलिस–प्रमुख. २. 'सोसो'— जॉर्जिअन्स स्टॅलिनला या नांवानें ओळखीत.








पक्षाच्या मुखपत्राचीं प्रुफें तपासण्याचें काम माझ्याकडे आलें. स्क्रियाबिनच्या हाताखालीं—ज्याला 'मोलोटॉव्ह' या नांवानेंच ओळखत—हें काम करावयाचें होतें. एके दिवशीं, मोलोटॉव्ह म्हणाला: "कॉम्रेड, आज रात्रीं तुला आलें पाहिजे. 'इवानाई निकोलाइझे' लेनिनकडून येणार आहे." मी गेलों तेव्हां बुद्धिबळाचा डाव पडला होता. प्रकरण जरा तापलेलेंच दिसत होतें. मोलोटॉव्ह चिडून बोलत होताः "तूं त्या मोहऱ्याला हात लावलास. आतां तुला तेंच हलवलें पाहिजे. मुळीं नियमच आहे तसा." "चुकून हात लागला माझा म्हणून सांगतोय् ना तुला... थोडीशी अक्कल शाबूत असलेला माणूस तें हलविणें शक्यच नाहीं."—त्या दुसऱ्या व्यक्तीनें रागावून उत्तर दिलें. मोलोटॉव्ह कांहीं केल्या ऐकेना. "चुकून असेल नाहींतर समजूनउमजून असेल, तुला तेंच हलविलें पाहिजे. नाहींतर खेळ बंद! आपण नाहीं खेळणार". "इतका अस्सल 'इचॅक' आपण नाहीं बघितला कधीं". "इचॅक? इचॅक म्हणजे काय?"

मोलोटॉव्हला नसेल माहीत त्याचा अर्थ! मला तरी ठाऊक होता. आमच्या जॉर्जिअनमध्यें 'लंबकर्णा'ला आम्ही 'इचॅक' म्हणतो. त्यांतील तो 'गोरी' हेलहि मी ओळखला. "स्वॅनिड्झे, इचॅक म्हणजे कायरे?" मोलोटाव्हनें मला विचारलें. "स्वॅनिड्झे? म्हणजे तूं बुदु तर नव्हेस? माझ्या लाडक्या बुदु..." असें म्हणून त्या पाहुण्यानें मला छातीशीं घट्ट कवटाळलें. त्याच्या त्या विचित्र वेषांतहि मी ज्योकाकाला तेव्हांच ओळखला. या प्रसंगानंतर ज्योकाकाची व माझी भेट अनेक वेळां होई. तो आतां 'स्टॅलिन' झाला होता. आपलें 'प्रवदां' तले लेख तो याच नांवानें लिहीत असे. आमचा जॉर्जिअनांचा तेथें एक अड्डाच जमला होता. आमच्या प्रांतांत आम्ही खूप भांडूं पण बाहेर मात्र आम्ही जॉर्जिअन सारे एक. यामुळेंच अनेक जॉर्जिअन सरदारांचीहि 'स्टॅलिन'ला फार मदत होई.

प्रिन्स चॅवचॅव्हइझे हा झारच्या खास रक्षकदलामध्यें एक फार वरचा अधिकारी होता. त्याचप्रमाणें, गुप्तपणानें बोल्शेविक पक्षाचेंहि सभासदत्व त्यानें पत्करिलें होतें. स्टॅलिननें त्याच्याजवळ गणवेषाचीच मागणी केली. त्याची कल्पना अशी, कीं त्या गणवेषांत त्याला पोलिसहि ओळखणार नाहींत.—आणि चॅवचॅव्हइझेनें पण त्याला एक गणवेष मिळवून दिला.

झारच्या पदरीं स्टॅलिनला ओळखणारे जॉर्जिअन्स खूपच होते. परंतु कोणताहि जॉर्जियन आपल्याला पकडून देणार नाहीं, ही त्याची पक्की खात्री.

स्टॅलिननें तो झारच्या रक्षकदलाच्या अधिकाऱ्याचा गणवेष चढविला. आणि तेव्हांपासून बेडरपणें कर्नलच्या त्या वेषांत, पोलिसांच्या 'पाहिजे'च्या यादींत नोंदला गेलेला हा राजाचा कट्टर शत्रु आणि सैबेरियांतून अनेकदां पहारेकऱ्यांच्या हातावर तुरी देऊन निसटलेला हा स्टॅलिन पोलिसांनीं दिलेली खडी ताजीम स्वीकारीत, दिवसाढवळ्या सेंट पीटर्सबर्गच्या भरवस्तींतून खुशाल दिमाखांत फिरत असे!

आमच्या पक्षाच्या मदतीसाठीं २१ मार्च १९१३ ह्या दिवशीं एक जलसा ठरविला होता. मोलोटॉव्हनें मला दारावर स्वयंसेवक म्हणून राहण्यास सांगितलें होतें. या कार्यक्रमाला स्टॅलिन येण्याची शक्यता होती, आणि त्यामुळेंच 'ओक्राना' चे गुप्त पोलिसहि आंत शिरकाव करून घेण्याचा प्रयत्न करणार हें निश्चित. "जर कोणाच्या हालचाली संशयास्पद वाटल्या, तर मला लगेच बोलाव" असें स्वयंसेवक-प्रमुखानें मला बजाविलें होतें. नाहीं म्हणायला, संशयास्पद वाटणारी अशी एक व्यक्ति दिसली खरी मला. गुळगुळीत दाढी केलेली, डाव्या हातांत एक हिरवी छत्री, डोळयाला सोनेरी काड्यांचा चष्मा—एकूण लक्षण कांहीं ठीक दिसत नव्हतें खारीनें! पण माझ्या शेजारून जातांना माझा एक जोरांत गालगुच्चा घेऊन ती व्यक्ति मला म्हणाली, "जरा नीट डोळे उघडून बघ, लेका!". तो स्टॅलिन होता.

जलसा चालू असतांनाच, प्रिन्स अॅवॅचिड्झेनें बातमी आणली कीं, "बाहेर पोलिस आले आहेत." स्टॅलिन शांतपणें रंगपटांत गेला, आणि तिथल्या माणसाला म्हणाला, "चल लवकर एक सुरेखसें बाईचें सोंग सजव बरें." थोड्याच वेळांत जरा जुन्या पद्धतीचाच पोशाख केलेली, झिरझिरीत जाळीनें जिचा चेहरा झांकलेला आहे अशी एक चाळीशीच्या सुमाराची बाई बाहेर जातांना मी पाहिली. 'सॅम्बॉलॅव्' पुढें झालाः "नमस्कार! इकडून चलावें, बाईसाहेब"

थोड्याच वेळांत 'सॅम्बॉलॅव्' परतला. "पकडलें रे त्याला! खरं म्हणजे बाकी सर्व ठीक जमलें होतें. पण त्याच्या त्या बुटांनीं घात केला." पुनःश्च सैबेरिया!...








... चार वर्षे काळें पाणी ...

आणि कारण काय,—तर केवळ पोलिसांच्या नजरें-तून न सुटलेला त्याचा तो अकरा नंबरचा बूट !

पहिल्या लग्नाच्या मानानें स्टालिनचें दुसरें लग्न खूपच सुधेपणानें झालें. आम्ही सगळे जॉर्जिअन्स अर्थातच उपस्थित होतों. लग्नानंतरची मेजवानीहि पुनः चांगली रंगली. टिमोशिंको व वॉरॉशिलॉव या दोन सेनानींना मी प्रथम याच वेळीं पाहिलें. ' सॉसो- ' काकानें स्वतःच्या हातानें ' चॅकोम-चिलि ' हें आमचें अगदीं अस्सल जॉर्जिअन पक्वान्न केलें होते. तें झालेंहि होतें मोठें खुमासदार. लोकाग्रहास्तव त्यानें एक सुरेखसें गाणेंहि म्हटलें. ' नॅदेज्दा '– त्याची नववधू —त्याच्याकडे मोठ्या अभिमानानें पहात होती त्या वेळीं.

तेवढ्यांत ' लेनिन 'चा फोन आला. बहुधा कामा-चाच असणार, म्हणून स्टॅलिन कुरकुरतच उठला. लेनिननें त्याचें अभिनंदन केलें होतें. त्या खुषींत त्यानें नॅदेज्दाला जवळ ओढून तिचें चुंबन घेतलें. " गॉर्की, गॉर्की " म्हणून आम्ही सारेजण ओरडलों. ती आमची एक जॉर्जिअन पद्धत आहे. ' गॉर्की ' म्हणजे कडू ! अशा तऱ्हेनें तरुण जोडप्याला चिडवून कडू तोंड गोड करण्याची त्यांना पुनः आम्हीं एक संधि देतों. मोठ्या आदबीनें त्यांनी आमच्या या निर्णयाचें स्वागत केलें !

' मॅडवानी 'नें विचारलें, " तूं ह्या लग्नाच्या भान-गडींत कशाला पडलास रे ? आमच्यासारखेंच लग्न न करतां खुशालचेंडूसारखें अनिर्बंध जीवनाचें सुख कां भोगीत नाहींस ?"– स्टॅलिन जरा रागावला. "तुम्हीं मला काय समजलांत ? आतां कांहीं आपण एखाद्या भूमिगत पक्षाचे सभासद नाहीं. आपण म्हणजेच सरकार. आणि आपणच जर बेजबाबदारपणें असें बाहेरख्याली वर्तन करूं लागलों, तर शत्रू त्या वर्मावर हल्ला केल्याशिवाय राहील काय ? आपण जबाबदारीनें वागलें पाहिजे. श्वानवृत्ति सोडून विवाहाचें पावित्र्य आणि गांभीर्य राखलें पाहिजे."

बोलण्यावरून बोलणीं निघतां, स्टॅलिनच्या 'खाजगी मालमत्ते'बद्दल विषय निघाला. त्याची 'मालमत्ता' म्हणजे केवळ एक छोटुकली फळबाग होती. त्यांतलीं द्राक्षें मीं लहानपणीं अनेक वेळां लंपास केलीं होतीं, आणि त्यासाठीं ' सॉसो 'काकाच्या हातचा बेदम मारहि खाल्ला होता. ' स्वेट्‌लाव ' सॉसोकाकाला म्हणाला, " सॉसो , तूं हाडाचा पक्का ' बुर्ज्वा ' च आहेस. तुझ्या त्या येवढ्या ' मौल्यवान् ' बागेंतलीं फळें चोरतांना कोणी सांपडला, तर तूं त्याला गोळी घालायलाहि कमी करणार नाहींस ! "—" मग काय सोडीन कीं काय ? " स्टॅलिन म्हणाला " माझा घाम गाळून मी ती फुलविली आहे. तुला नाहीं समजायचें तें—तूं म्हणजे नुसता बुद्धू आहेस. मी आहे शेतकऱ्याचा मुलगा. आम्हीं कांहीं वेगळेच लोक आहोंत ! "

कातड्याचे जोडे बनविणें हा स्टॅलिनचा मोठा आवडता छंद. कम्युनिझमप्रणीत क्रांतीला जागतिक स्वरूप देण्याअगोदर ती फक्त रशियांतच खोलवर रुजवावी हा बंडखोर विचार नॅदेज्दाचे बूट शिवत असतांना सुचला यावर कोणाचा विश्वास बसेल का ?

त्याच्या मुलांना त्याचा भयंकर धाक वाटे. एकदां आर्जोनिकिड्झे त्याला थट्टेनें म्हणालाः " सॉसो, जर तुझ्या मुलाला चोपणें यापुढें बंद केलें नाहींस, तर एका कम्युनिस्टावर हात चालविल्याबद्दल तुझ्याविरुद्ध तक्रार नोंदवीन. तो एक बाल-कम्युनिस्ट ( Pioneer ) आहे हें तुला विसरून चालणार नाहीं. त्यानें उद्यां जर अशी साक्ष दिली कीं पक्षाचा प्रमुख कार्यवाहच त्याला पिटीत असतो, तर त्यांत कांहीं शोभा आहे का ? " सॉसोनें ताड्दिशीं उत्तर दिलेंः " सर्ज, तुझं काम तूं कर ना ! या इथें मी कांहीं पक्षाचा प्रमुख कार्यवाह नाहीं ! या पोरट्याचा बाप आहे, आणि अस्सल जॉर्जिअन पद्धतीनेंच मी त्याला वाढवणार आहे. तो ' पायोनिअर ' असेल नाहींतर आणखी कांहीं असेल. हें पोरटें मला उनाड बनूं द्यायचें नाहीं. नाहींतर आहेतच कीं इतर मोठमोठ्या अधिकाऱ्यांचे एकापेक्षां एक चिरंजीव ! "

सॉसोच्या लग्नाच्या १० व्या वर्षदिनानिमित्त झालेल्या मेजवानीप्रसंगीं प्रथम मी ' लॅव्हरेंटी बेरिया 'ला बघितलें. तोही पक्का जॉर्जिअन आहे. त्या दिवशीं, एकदा आपण नुसत्या पिस्तुलानें एका अस्वलाची कशी शिकार केली याची साद्यंत हकिगत स्टॅलिननें सांगि-तली. त्याच्या जिवावरचाच प्रसंग होता तो. जर थोडें चुकतें तर त्या अस्वलामुळें इतिहासाचा सर्वच ओघ किती बदलला असता !








आमच्या गप्पा ऐन रंगांत होत्या आणि मोलोटॉव्ह व सर्ज मात्र एकमेकांना कसल्यातरी चिठ्ठ्या देत होते. विचारांत पुरते गर्क झालेले दिसले. पटाशिवायच बुद्धिबळांचा डाव चालला होता त्यांचा ! मोलोटॉव्हचा हा एक फार आवडता छंद आहे, आणि महत्त्वाच्या बैठकीच्या प्रसंगींसुद्धां फार कंटाळवाणें झालें म्हणजे त्याचा हा खेळ सुरु होतो. इतक्यांत आतांपर्यंत मूकपणानें खेळल्या जाणाऱ्या डावानें प्रकट रूप धारण केलें ! " शह ! " मोलोटाव्हनें खवळून विचारलें, " कशानें हो गुरु, शह देताय तुम्ही ? ". " कशानें म्हणजे ? माझ्या उंटानें शह दिला मी. " " तुला वेड लागलें आहे वेड. अर्ध्या तासापूर्वींच तुझा उंट माझ्या उंटानें गिळला आहे म्हटलं " " अरे चल् ! मीच तुझा उंट खाल्ला आहे. "

शेवटी स्टॅलिन मध्यें पडला. आणि त्यानें दोघांनाहि दम भरला: " मी पॉलिट्ब्युरोपुढें ठरावच मांडणार आहे कीं या तुमच्या बुद्धिबळावर बंदी असावी. " " करुन पहा " थंडपणें मोलोटॉव्ह उद्‌गारला "आम्ही यावर मतें घ्यायला लावूं आणि बघशील तूं, तुझ्यापेक्षां मलाच जास्त मतें मिळतील. "

नंतर नादेज्दानें गोरोदकी[3] खेळण्याचा बूट काढला. स्टॅलिन, व्हॉरोशिलॉव, बेरिया, बुडेनी आणि टिमोशिंको विरुद्ध मोलोटॉव्ह, सर्ज, कॅगनोविच्, मायकेलादज्, आणि मी असे दोन संघ करुन खेळाला सुरुवातहि झाली. पहिल्याच छडीच्या फेंकीनें स्टॅलिननें २० यार्डांवरुन आमची गॉरॅडोक साफ मोडून टाकली. आणि मला न मोडतां आलेला 'साप'हि एकाच फटक्यांत त्यानें उधळून लावला ! व्हॉरोशिलावनें केलेल्या स्तुतीनें स्टॅलिन अगदीं भारावून गेला. पुन्हां 'साप' बनविला. आतां आली मोलोटॉव्हची पाळी. तो खेळायला सुरुवात करणार इतक्यांत स्टॅलिन मोठ्यानें खदखदून हंसला: " वा: निकोलिविच् ! काय फक्कड पकड आहे पण... म्हातारी नाहीं कां झाडू धरीत, तशीच धरली आहेस तूं छडी ! " मोलोटॉव्ह संतापला–"तूं कर माझी चेष्टा, पण चष्मा घालून खेळायची वेळ आली तुझ्यावर म्हणजे समजेल कसें होतें तें. " दोनदां मोलोटॉव्हनें छडी फेंकली, पण एक खुंटी जागची हलली असेल तर शपथ. " हा खेळ नकोच. आपण 'केग्ली'चा खेळ खेळू. मग बघ तूं " –

नादेज्दा नसती, तर मला वाटतें रात्रभर आम्हीं असेच खेळत बसलों असतों. आधीच जॉर्जिअन म्हणजे भांगिष्ट ! आणि त्यांत स्टॅलिनची आरडाओरड–मग तर विचारूंच नका !

'बस्स झाला तुमचा खेळ' असा नॅदेज्दाचाच हुकूम झाल्यावर काय करणार ? खेळ बंद !

या नॅदेज्दाच्या मृत्यूचें गूढ कोणालाच उकललें नाहीं आणि मलाहि तें शेवटपर्यंत कोडेंच राहिलें. लिझा कॅझनोवाशीं स्टॅलिनच्या वाढत्या स्नेहामुळें संशय येऊन निराशेनें तिनें आत्महत्या केली असें बोललें जातें. तर स्टॅलिननें केलेल्या पक्षाच्या 'शुद्धीकरणा'च्या सत्रांत, तिच्या अनेक स्नेह्यांना झालेल्या जबर शिक्षा, व त्याबाबतींत आपण कांहीं करूं शकलों नाहीं याची जाणीव यामुळेंच तिनें जीव दिला असाहि एक प्रवाद आहे. स्वेट्लानानें ( तिची मुलगी ) मात्र तिनें झोपेच्या गोळ्या अधिक प्रमाणांत घेतल्या त्यामुळें तिला मृत्यु आला असें मला सांगितलें.

नॅदेज्दाच्या मृत्यूच्या दुःखाचा तडाखा स्टॅलिनला जबरच बसला होता. त्या दुःखी मनःस्थितींत एक लिझाशिवाय स्टॅलिनची भेट कोणालाच घेतां येत नव्हती.—मोलोटॉव्हला सुद्धां नाहीं !

एकूण या सर्व ' लिझा–प्रकरणा'मुळें, स्टॅलिन आतां लिझाच्या सहवासांत राहतां कामा नये अशी व्यवस्था करण्याचें मोलटॉव्ह आणि बेरिया यांनी मनावर घेतलें. चक्रें फिरूं लागलीं ! अल्पावधीतच ' लिझा ' पक्षद्रोही ठरली ! या आरोपावरुन मध्य-आशियांत तिची रवानगी झाली. तिनें तेथेंच आत्महत्या केली.

लिझाचा कांटा अशा रीतीनें काढून टाकल्यानंतर या चौकडीनें रोझा नांवाच्या सुंदर स्त्रीशीं स्टॅलिनचा विवाह घडवून आणला.

या सर्व घडामोडींनंतर बरेच दिवसांनीं मी स्टॅलिनला भेटण्यास गेलों. त्याच्या ऑफिसच्या बाजूस मी थांबलों होतों इतक्यांत गुप्त-पोलिसांचा प्रमुख ' यागोडा ' व सुप्रीम कोर्टाचा सरकारी वकील ' विशिन्स्की ' बाहेर आले. यागोडा कसल्यातरी भीतीनें पांढराफटक पडला होता. ' थोड्याच दिवसांत आपण राज्यद्रोही ठरणार '—आणि त्यानंतरचा त्याचा

३. एक रशियन खेळ – लहान खुंट्या पुरुन बनविलेल्या निरनिराळ्या आकृती प्रतिपक्षानें काठी फेंकून मोडावयाच्या.








भेसूर भविष्यकाळ त्याला दिसत असावा. विशिन्स्की मात्र दिलखुलासपणें हंसत खुशींत होता.

आंत जाऊन माझें आणि स्टॅलिनचें थोडें बोलणें होतें तोंच टॉवस्ट्यूकानें आंत येऊन "यागोडाला 'त्या' संबधीं (हें बहुधा, झिनोविव्ह्-कामेनेव प्रकरण असणार) आणखी कांहीं बोलणें करावयाचें आहे" असें सांगितलें. स्टॅलिनचा संतापानें नुसता भडका उडला. "विरोधकांना चेंचूनच टाकलें पाहिजे, आणि जो कोणी त्याला वांचवायचा प्रयत्न करील त्याचीहि तीच गत होईल; जा सांग जा त्याला."

एक क्षणभर स्टॅलिन गप्प राहिला. आणि एकदम त्यानें मला विचारलें "बुदु, माझ्यासाठी एक गोष्ट करशील का तूं?"

मी? आणि स्टॅलिनसाठीं काय करणार?

"मी उद्यां 'साकी' ला जात आहे. आपल्या घरचें असें कोणीतरी माझ्याबरोबर मला हवें आहे. येशील?"

एकदम मला आमच्या जॉर्जिअन रिवाजाची आठवण झाली. एखाद्या फार महत्त्वाच्या प्रश्नाची तड लावायची असे तेव्हां पूर्वीचे राजे त्याबद्दल निर्णय आपल्या आप्तस्वकीयांच्या मेळाव्यांत घेत. आतांचा क्षण हा सॉसोकाकाच्या आयुष्यांत असाच महत्त्वाचा होता. हजारों राजांना यमसदनास पाठविणाऱ्या डेविड आणि गार्गोस्लाव् या आमच्या इतिहास-प्रसिद्ध राजांचेंच उदाहरण तोहि गिरवीत होता.

त्याच्याबरोबर जायला नकार तरी कसा देणार? आमच्या पवित्र जॉर्जिअन् रिवाजाला सोडून झालें असतें तें!

सबंध प्रवासांत, स्टॅलिनला माझी सोबत मोठी सुखावह होत होती, हें निश्चित. आम्ही जॉर्जिअन्स तसे धर्मभोळे! आपल्या सर्व शत्रूंचें पुरतें निर्दालन करण्याचा महाभयंकर निश्चय तो करीत होता. प्रत्यक्ष मृत्यूशींच त्याची झुंज होणार होती. अशा वेळीं आपल्याच रक्ताचा आणि कुळीचा तरुण दोस्त शेजारीं असल्यावर केवढा आधार वाटला असेल त्याला?

आम्ही 'युपॅथोरिया' ला पोंचेपर्यंत स्टॅलिनच्या रक्षणाची व्यवस्था फार कसोशीनें केली होती. याच वेळीं मॅलेन्कॉवनें अतिशय निष्ठेनें काम करण्याच्या आपल्या गुणानें स्टॅलिनचें लक्ष वेधून घेतलें. यानंतर मॅलेन्कॉवला भराभर बढतीच्या जागा मिळत गेल्या त्याचें मर्म यांतच असावें.

आमच्या संध्याकाळच्या फेरफटक्याच्या वेळीं स्टॅलिनच्या विचारांचें ओझरतें दर्शन मला होई. एकदां तो मला म्हणालाः "माझ्याहून २७ वर्षांनीं लहान असलेल्या रोझाशीं मी लग्न केलें म्हणून लोक मला नांवें ठेवतात. पण लोकांच्या पुढें मला सच्छील चारित्र्याचा आदर्श ठेवावयाचा आहे. आयुष्याचीं ऐन उमेदीचीं वर्षे हालअपेष्टांत काढलेल्या क्रांतिकारकांच्या बाबतींत नेहमींच नैतिक अधःपतनाचा धोका फार मोठा असतो. फ्रेंच राज्यक्रांति केवळ फ्रेंच नेत्यांच्या अत्यंत स्वैर आणि अनीतिमय वर्तनानेंच धुळीला मिळाली. झिनोविव्ह आणि कामेनेव्ह यांचा लवकरच समूळ निःपात झालेला दिसेल. तुला माहित आहे बुदु, लेनिनग्राडचा प्रेसिडेंट असतांना झिनोविव्हनें काय किळसवाणे प्रकार केले आहेत ते? वेश्यांच्या संगतींत सतत हा लोळत पडलेला असायचा. तें पाहिल्यावरच मी ठरविलें होतें कीं या चिघळल्या जखमेवर रसरसल्या लोखंडी कांबेनेंच डागायला पाहिजे. कामेनेव्ह तर काय? अत्यंत पवित्र अशा गोष्टींचीहि तो उघडउघड बेजबाबदारपणें सदाच टर उडवीत असे. आणि मुरॅलोव्ह! त्याचें काय सांगावें? गटारांत लोळणाऱ्या एका गलिच्छ बाईशीं लग्न लावून मोठ्या फुशारकीनें मिरवीत असे तो. श्शीः! गलिच्छ आहे तो सगळाच प्रकार." हें बोलतांना स्टॅलिनचे डोळे नुसते आग ओकीत होते. वाटेंतल्या एका झुडपाची फांदी काड्कन मोडून तो म्हणाला "या सगळ्या सडलेल्या धेंडांच्या माना अशा मुरगळून टाकणार आहे मी. अगदीं एकाचीसुद्धां त्यांतून सुटका होणार नाहीं. ... रॉबेस्पिअरचें शेवटचें भाषण वाचून या सगळ्या क्रांतिशत्रूंची मला पुरी ओळख पटली. रॉबेस्पिअर अधिक जगता, तर माणूस कित्येक शतकें आधी सुखी झाला असता."

"पण ट्रॉट्स्कीचें काय? त्यानें तर कधीं नीतिबाह्य वर्तन केलें नाहीं ना?" मी विचारलें.

"ट्रॉट्स्कीची गोष्ट अगदींच वेगळी आहे. तो अनीतिमान् नाहीं हें खरें. पण त्यानें दुसऱ्याच एका प्रकारानें क्रांतीला धोका निर्माण करून ठेवला आहे. तो पक्का व्यक्तिस्वातंत्र्यवादी, स्वयंकेंद्रित आणि समाजद्वेष्टा आहे. स्वतःच्या बुद्धीच्या तोऱ्यांत नेहमींच आमचा पाणउतारा करीत असे. काय केलें आहे रे त्यानें क्रांतीसाठीं? विभूतिमाहात्म्याचें युग आतां संपुष्टांत आलें











आहे. यांत्रिक प्रगतीमुळें यापुढें जनताच सत्ताधारी बनणार आहे. या सत्रांत कांहीं महान् क्रांतिकारकांचीहि आहुति पडेल. पण त्याला इलाज नाहीं. आमचा मार्ग निष्कंटक करणें भाग आहे आम्हांला. ''

यानंतर ज्योकाकाला मी भेटलों तेव्हां आंतरराष्ट्रीय परिस्थिति पुष्कळच बिघडली होती. कामाचा भयंकर ताण पडून, त्याची प्रकृति चांगलीच खालावली होती. अहोरात्र २४ तास त्याचें काम चालूंच असें. आणि मॅलेन्कॉव, इतर सेनानी आणि मुत्सद्दी यांचा त्याच्याभोंवतीं सतत गराडा पडलेला असे. स्वेट्लाना एकदां संतापून मला म्हणाली: '' मॅलेन्कावचें दर्शनसुद्धां नकोसें झालें आहे मला. तो कांहीं पपांची पाठ सोडीत नाहीं. कामाच्या रगाड्यानें त्यांचा जीव घ्यायचा आहे कीं काय ? ''

एकूण मॅलेन्कॉवबद्दल मत फारसें चांगलें नव्हतें. त्याची ती तुंदिलतनु मूर्ति, चेंडूसारखें गोल तोंड आणि सुपासारखे कान. तो बरोबर सर्कशीतल्या बुटक्या विदूषकासारखा दिसे.

यावरून मला आठवण झाली. अगदीं क्षुल्लक वाटणारे प्रसंग पण त्याचे परिणाम किती भयंकर होतात कांहीं वेळां ! आम्ही व्हॉली-बॉल खेळत होतों. झुकोवच्या कौशल्यामुळें आम्हीं भराभर गोल करीत होतों. तेव्हां मॅलेन्कॉवनें चिडून तळव्यानें बॉल मारण्याऐवजीं बुक्कीनें बॉल मारण्यास सुरवात केली. झुकॉव्हनें तक्रार केली. पण प्रत्यक्ष स्पष्ट असा कांहीं नियम त्याबाबत नसल्यानें स्टॅलिननें तक्रारीकडे लक्षच दिलें नाहीं. दोघेहि तापले होते. आम्ही गोल लावीतच होतों. इतक्यांत मॅलेन्कॉवनें बॉल ऐसा थाड्दिशीं लगावला ! . . .मलाच लागायचा पण चट्कन वांकल्यानें मी बचावलों आणि तो बॉल थेट झुकॉव्हच्या नाकाडावर येऊन आदळला. रक्तानें तो नुसता न्हाऊन निघाला. संतापाच्या भरांत त्यानें मॅलेन्कॉवला एक अस्सल शिवी हांसडली. स्टॅलिननें मध्यें पडून तें भांडण थांबवलें. सगळे गेल्यावर स्टॅलिन स्वतःशीच पुटपुटत होता : '' हा मॅलेन्कॉव त्या मोलोटाव्हसारखाच पक्का इब्लिस आहे. ! खेळायचें तें मजा म्हणून. का लहान मुलासारखें भांडायचें ? '' पण हें वैर पुढेंहि असेंच धुमसत राहिलें. झुकॉव्हची ती शिवी मॅलेन्कॉव कधीच विसरला नाहीं. त्याचा बदला म्हणून १९४७ मध्यें झुकॉव्हची ओडेसांत बदली केली गेली !

२३ जूनला, भल्या पहांटे आम्ही मासे पकडण्यासाठीं नदीवर गेलों होतो. स्टॅलिनच्या संरक्षणासाठीं एक लॉंच होती पण त्याच्याच हुकुमावरून ती मुद्दाम लांब उभी केली होती. ६॥-७ चा सुमार असेल. ती लॉंच झपाट्यानें आमचेकडे येतांना दिसली. स्टॅलिन भलताच संतापला. तितक्यांत तीं लॉंच आमच्यापासून कांहीं अंतरावर उभी राहिली. तीवरील कॅप्टन कॅरॅझॉवनें खणखणीत आवाजांत सांगितलें : '' कॉम्रेड स्टॅलिन, रेडिओवर कॉम्रेड मोलोटॉव्हकडून तांतडीची बातमी आली आहे कीं जर्मन सेना आपल्या प्रदेशांत घुसल्या आहेत. कॉम्रेड स्टॅलिनच्या हुकमाची मोलोटोव्ह वाट पहात आहेत.''

मी ज्योकाकाकडे पाहिले. भावनांची कोणतीहि खळबळ त्याच्या मुद्रेवर दिसत नव्हती. क्षणभर त्यानें पाण्याकडे पाहिलें. आणि मग जणूं कांहीं झालेंच नाहीं अशा थाटांत सावकाशपणें गळ वर काढला. दोन मोठे मासे त्याला अडकले होते.

या बातमीनें आम्ही मात्र सर्वचजण हादरून गेलों. पॉसक्रीबिचेवची मुद्रा तर दीनवाणी झाली होती. त्यानेंच रिबेन्ट्रॉपशीं बोलणीं केली होतीं. आणि त्यावरून हिट्लर चढाई करणार नाहीं, अशी त्याची पक्की खात्री होती. आतां स्टॅलिनला तोंड तरी कसें दाखवूं या विचारानें तो अधोमुख बसला होता.

'' हिट्लरनें आपल्याला पुरें बनवलें '' थंड आवाजांत स्टॅलिन उद्गारला. '' मला नव्हते वाटलें कीं तो आतांच चढाई करील. पण असो. सबंध राष्ट्र जर खंबीरपणें एकदिलानें उभें राहिलें तरच जर्मनांविरुद्धची ही लढाई आपण जिंकूं. '' सगळे गळ त्यानें बाहेर काढले आणि दहाच मिनिटांत आम्ही किनाऱ्यावर आलों.

युद्ध संपल्यानंतर ११ नोव्हेंबरला मी रशिया सोडला. माझी प्रेयसी हंगेरिअन आणि शिवाय कॅथॉलिक असल्यानें रशियांत रहाण्यास ती तयार नव्हती. त्यानंतर पुन्हां मला माझा ज्योकाका दिसला नाहीं.

जगाच्या इतिहासांत वैशिष्ट्यपूर्ण स्थान मिळविलेली एक जबरदस्त व्यक्ति, या दृष्टीनें जरी जग त्याचेकडे पहात असलें तरी माझ्या अंतःकरणांत मात्र त्याची स्मृति ' ज्यो काका ' अशीच राहील.

---



अनुक्रमणिका






श्री. ह. कृ. मोहनी

# भूदानयज्ञ आणि आर्थिक क्रान्ति

भूदानयज्ञाचें आंदोलन सुरू होऊन सुमारें अडीच वर्षें झालीं. एवढ्या थोड्या अवधींत त्या आंदोलनानें घडवून आणलेला परिणाम चमत्कार या कोटींत घालण्यासारखा नसला तरी तो आश्चर्यकारक आहे, यांत शंका नाहीं. आतांपर्यंत सुमारें एकवीस लाख एकरांवर जमीन भूदानयज्ञ आंदोलनांत मिळाली आहे, आणि १९५२ च्या सेवापुरी येथें भरलेल्या सर्वोदय-संमेलनानें संकल्प केल्याप्रमाणें, पुढील संमेलन भरेपर्यंत पंचवीस लाख एकर जमीन मिळविण्याचें उद्दिष्ट खचितच सफल होईल.

## लहान बीजाचा प्रचंड वृक्ष

भूदानयज्ञाचे जनक व अध्वर्यु विनोबा यांच्या मनांत ही भूदानयज्ञाची कल्पना गांधीजींच्या मृत्यूनंतर सुप्तावस्थेंत हळुहळु साकार होत होती असें दिसतें. गांधीजींच्या मृत्यूनंतर आचार्य विनोबांचें लक्ष निर्वासितांच्या प्रश्नाकडे वेधलें. निर्वासितांचा प्रश्न खरोखरींच अवाढव्य आणि अत्यंत कठिण होता. निर्वासितांपैकीं बहुसंख्य लोक शेतकरी होते. फाळणीनंतरच्या हलकल्लोळांत आपल्या शेतजमिनीवरून उठवलेल्या व देशोधडीला लागलेल्या ह्या निर्वासितांची अगदीं वाताहत झालेली होती. विनोबाजी त्या सुमारास दिल्लीला होते. त्यांच्या मनांत त्या वेळीं अशी कल्पना आली कीं, या बिचाऱ्या निर्वासितांना जमीनीचे लहान लहान तुकडे देऊन त्यांना त्यांचा योगक्षेम चालविण्याइतका धंदा त्यांमधून देण्याची तरतूद आपणांस करतां आली पाहिजे. पण या त्यांच्या कल्पनेला मूर्त स्वरूप यायला तो काळ अनुकूल नव्हता. विनोबा निर्वासितांचीं दुःखें हलकीं करीत उत्तर हिंदुस्थानांत आपला दौरा करीत असतांना, त्यांच्या मनांत स्फुरलेली व अंकुरलेली ही बीजभूत कल्पना त्यांच्या मनोभूमींत तशीच अप्रकट सुप्तावस्थेंत पडून होती.

सर्वोदयसमाजाच्या शिवरामपल्ली येथील सभेनंतर विनोबा तेलंगणांत पायीं यात्रेला निघाले व कम्युनिस्टांनीं 'त्राहि भगवन्' करून सोडलेल्या तेलंगणांत ते हिंडत असतांना एका खेडेगांवीं आले. तेथें एका प्रार्थनोत्तर झालेल्या सभेंत तेथील खेडुतांनीं त्यांना कम्युनिस्टांनीं केलेले खून, लूटमार, जाळपोळ या विषयींची व आपल्या हलाखीची शोककारक कहाणी सांगितली आणि 'आम्हांला कांहीं जमीन द्या' अशी विनवणी केली. विनोबा ही त्यांची करुण कहाणी ऐकत विचारांत चूर होते व या एकंदर कुचंबलेल्या परिस्थितींतून काय मार्ग काढावा या चिंतेंत निमग्न होते. इतक्यांत त्या सभेंत एक गृहस्थ उठून उभे राहिले व "भूमिहीनांना शंभर एकर भूमि द्यावयाला मी तयार आहे" असें त्यांनीं जाहीर केलें! त्याबरोबर विनोबांच्या प्रतिभेला एकदम साक्षात्कार झाला. देशांतील भूमिविषयक प्रश्नांचें उत्तर त्यांना स्फुरल्यासारखें झालें! तेलंगणांत त्या दिवशीं पेरलेलें शंभर एकरांच्या भूदानाचें जोमदार बीज पुढें जोमानें वाढूं लागलें, त्याला अंकुर फुटले आणि आज अडीच वर्षांनंतर त्या बीजाला २५ लाख एकर व्यापूं पहाणाऱ्या प्रचंड वृक्षाचें स्वरूप आलें आहे.

पंचवीस लाख एकर जमीनीनें अर्थातच सर्वसेवासंघाचें समाधान होणार नाहीं. नुकत्याच चांदिल येथें भरलेल्या सर्वसेवासंघाच्या कार्यकर्त्यांनीं तर असें निक्षून बजाविलें आहे कीं, १९५७ चें ऐतिहासिक क्रान्तिकारक वर्ष उगवेपर्यंत पांच कोट एकर जमीन भूदानयज्ञाला मिळाली पाहिजे.

## वैफल्यनिराशांवर तोडगा

आपलें राष्ट्र अत्यंत आणीबाणीच्या मानसिक अवस्थेंत असतांना, एका आणीबाणीच्या मानसिक क्षणीं, भूदानयज्ञास प्रारंभ झाला आहे. स्वराज्य मिळालें तरी त्यामुळें राष्ट्राच्या अपेक्षा, सामान्य माणसानें बाळगलेलें सुखस्वप्न पूर्ण झालें नाहीं. त्यामुळें सबंध देशभर एकप्रकारचा हताशपणा, वैफल्य लोकांच्या मनोवृत्तीवर आलेलें होतें. ब्रिटिश सत्ता येथून नाहींशी








झाली कीं, आपला देश नंदनवन होईल अशी सामान्य जनांची कल्पना होती. स्वराज्य म्हणजे त्याला स्वर्गच वाटे. उलट पक्षीं स्वराज्य मिळाल्यानंतर, राष्ट्रीय सरकारपुढें 'न भूतो न भविष्यति' असे महान् कठिण प्रश्न उभे राहिले. स्वराज्य प्राप्त करून घेण्यांत गांधीजींनीं शोधून काढलेल्या एका अद्वितीय व अभूतपूर्व तंत्राचा-च मुख्यतः उपयोग झाला. परंतु त्यांच्या अहिंसक तंत्राच्या शक्तीलाहि कांहीं मर्यादा होत्याच. हिंसक क्रान्तीच्या अंगीं देशाच्या परिस्थितींत बदल घडवून आणण्याचें जेवढें सामर्थ्य असतें तेवढें सामर्थ्य गांधीमार्गानें घडवून आणलेल्या अहिंसक क्रान्तीच्या अंगीं आढळून आलें नाहीं.

उत्साह उत्पन्न करावयाचें तंत्र गांधीजींना उत्तम अवगत होतें व त्यांच्या अलौकिक व्यक्तिमत्त्वामुळें तेच तें तंत्र उत्तम रीतीनें हाताळूं शकत. गेल्या तीस वर्षांत त्यांनीं जो राष्ट्रापुढें कार्यक्रम ठेवला तो तेच म्हणून तो ठेवूं शकले, इतका तो अभिनव, आणि पाश्चात्त्य संस्कृतीच्या परंपरागत नियमांना धुडकावून लावणारा होता! पण स्वराज्यप्राप्तीनंतर दुर्दैवानें थोड्याच दिवसांनीं त्यांचा अंत झाला. जी कॉंग्रेस-संस्था त्यांनीं देशव्यापी व बलिष्ठ केली ती स्वराज्य-प्राप्तीनंतर राज्यकारभाराचा अनुभव नसल्यामुळें जपून पावलें टाकीत, उत्पन्न झालेले प्रश्न सोडविण्यांत चूर होऊन गेली. गांधीजींचे अनुयायी तर हतबुद्धच होऊन गेले. गांधीजींच्या विचारसरणीचा स्वीकार लोक उत्साहानें करतील याकरितां काय करावें हें त्यांना उमजेना! कॉंग्रेसमधील कांहीं वजनदार पुढाऱ्यांनीं कॉंग्रेस-घटनेमध्यें कांहीं विधायक स्वरूपाचे बदल घडवून आणले. भूमिविषयक सुधारणांविषयीं एक भूमिविषयक समिति नेमून तिच्याकरवीं एक अहवाल तयार करविला, गांधीवादी अर्थशास्त्रावर आधारलेली सर्वोदययोजना आंखली व या मार्गांनीं कॉंग्रेससंस्थेला गांधीवादी आकार द्यावयाचे प्रयत्न केले. पण हे सर्व प्रयत्न दुबळे ठरले. काळाच्या गरजा भागविण्याइतके ते प्रभावी ठरले नाहींत.

अशा निरुत्साही परिस्थितींत, राष्ट्रावर आलेलें वैफल्य-निराशांचें पटल दूर करण्याचा, राष्ट्रपुरुषाच्या प्रकृतींत उत्पन्न झालेल्या दोषावर रामबाण उपाय शोधून काढावयाचा आशादायक मार्ग भूदानयज्ञानें दाखविला आहे. भूदानयज्ञाचें आंदोलन पक्षीय राज-कारणाच्या पेक्षा उच्च भूमिकेवरून, पक्षातीत भूमिके-वरून चाललें आहे ही गोष्ट अत्यंत महत्त्वाची आहे. याशिवाय गांधीजींनीं दाखवून दिलेल्या अहिंसक तंत्राचा अवलंब या भूदानयज्ञांत केलेला असल्यामुळें जनतेचीं मनें भारून टाकण्याचें सामर्थ्य त्यांत साह-जिकच उतरलें आहे. या आंदोलनाचें आवाहन सर्वांना सार्वत्रिक राहावें असाच त्याच्या योजकांचा संकल्प असून तेंच त्याचें प्रमुख वैशिष्ट्य होय. भारत हा कृषिप्रधान देश होय. जमीनीचा प्रश्न हाच भारता-चा महान् प्रश्न असल्यामुळें तो सोडविणें म्हणजेच बहुतेक सर्व प्रश्न सुटणें होय. अशा या प्रश्नाला भूदान-यज्ञानें हात घातला आहे.

### भूदानयज्ञाचीं उद्दिष्टें

भूदानयज्ञानें ज्या तत्त्वांचा व विचारांचा सार्वत्रिक प्रसार करावयाचें कंकण बांधलें आहे ते संक्षिप्त रीतीनें असे सांगतां येतील:

(१) जमीन ही सर्वांची आहे. तिचा उपयोग हवा व पाणी यांप्रमाणें सर्वांना मुक्त असावा, जमीनी-वरील वैयक्तिक मालकीचें शक्य तों विसर्जन झालें पाहिजे.

(२) स्वतःला जितकी लागवड करतां येईल त्या पेक्षां जास्त जमीन ज्यांच्याजवळ असेल त्यांनीं ती करूं इच्छिणाऱ्या भूमिहीनांना वांटून द्यावी.

(३) जमीनीची अशी वांटणी झाली तरच वर्ग-हीन व जातिभेदहीन समाज निर्माण होईल. असा समाज निर्माण करणें हेंच सर्व सत्प्रवृत्त लोकांचें उद्दिष्ट आहे. मालमत्ता आणि संपत्ति यांच्या विषम वांटणी मुळेंच राष्ट्राच्या शांततेला धोका उत्पन्न होत असतो.

(४) देशांतून सर्वत्र प्रेम, न्यायबुद्धि, समता यांची जाणीव निर्माण झाली पाहिजे.

(५) आर्थिक विषमता नष्ट करण्याकरितां अनु-कूल वातावरण निर्माण व्हावें म्हणून, लहानमोठ्या सर्व जमीनमालकांना, त्यांनीं आपली जमीन वांटून द्यावी असें आवाहन करावें.

(६) या योगानें जें मानसिक वातावरण निर्माण होईल त्यामुळें आक्रमक राष्ट्रवाद व वंश-वर्णाधिष्ठित अन्यायमूलक भेद, माणुसकीला लांच्छन आणणाऱ्या विपरीत कल्पना व तज्जन्य अरिष्टें यांचा नाश होईल.








(७) एक जागतिक सरकार स्थापन व्हावें, सर्वत्र जगांत बंधुत्व व शांतता नांदावी अशा विचारांनीं प्रेरित झालेला नवमानव निर्माण करणें हें भूदानयज्ञाचें उद्दिष्ट आहे.

अहिंसेवर अधिष्ठित अशा नव संस्कृतीची स्थापना करणें हें या आंदोलनाचें ध्येय असून हिंसक शस्त्रास्त्रां-ऐवजीं अहिंसक नैतिक शस्त्रास्त्रसामग्री (moral armament) तयार करणें हेंहि त्याचें उद्दिष्ट आहे.

गेल्या दोन-अडीच वर्षांत भूदानयज्ञ-आंदोलनानें जी प्रगति केली आहे ती पहातां, झालेलें कार्य व उत्पन्न झालेलें वातावरण आशादायकच आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. गांधीजींच्या विचार-सरणीशीं सुसंगत असा ग्रामसुधारणेचा पुढील नवीन टप्पा कोणता असावा, भारतीय जनतेला जाग्रत कर-णारी एक देशव्यापी चळवळ कशी व्हावी याची दिशा भूदानयज्ञानें दाखविली आहे.

### स्वतंत्र नैतिक शक्ति

सध्यांचें सरकार आणि ज्याचें हें सरकार तो कांग्रेसचा भारतव्यापी राजकीय पक्ष यांचें धोरण व कार्य-पद्धति ही एका विशिष्ट ध्येयानुसार कांटेकोरपणें चाल-लेलीं आहे असें दिसून येत नाहीं. किंबहुना एका विशिष्ट ध्येयाला चिकटून राहून राज्यकारभार हांकणें त्यांना जमणारहि नाहीं. वेळोवेळीं जे जे कठीण प्रश्न उत्पन्न होतील ते राज्यकारभाराच्या सोयीनुसार सर्वांशीं जमवून घेऊन कसेबसे सोडविणें व आलेल्या प्रसंगाला तोंड देणें एवढेंच हें सरकार करूं शकतें. एखादें ध्येय आंखून त्याचा प्रसार करणें हें सरकारचें काम नव्हे. समाजकल्याणाच्या विविध योजनांचा समन्वय करतां-ना सरकारचें धोरण नेहमींच उपयुक्ततावादी, प्रयोग-शील, मिळतें घेणारें असेंच रहाणार.

या उलट भूदानयज्ञाचे प्रवर्तक व त्याचे अनुयायी हे ध्येयनिष्ठ नैतिक प्रेरणेनें प्रेरित झालेले आहेत. नव-समाज निर्मितीचें जें उद्दिष्ट त्यांनीं आपल्यासमोर ठेविलें आहे, त्याकरितां त्यांनीं आपल्या ध्येयाशीं व प्रेरणेशीं एकनिष्ठ राहून आपल्या सर्वस्वाचा होम कर-ण्यास तयार राहिलें पाहिजे. म्हणून त्यांनीं सरकारी धोरणावर अवलंबून न रहातां स्वतंत्रपणें आपला मार्ग आंखला पाहिजे. सरकारचें ध्येय 'सामाजिक कल्याण–राज्य' (Welfare State) स्थापणें हें असून त्या दृष्टीनें जें सरकारनें धोरण आंखलें असेल, त्याला पूरक असें काम करण्याकडे आपण आपल्या शक्ती वेंचाव्या असेहि भूदानयज्ञाचे पुरस्कर्ते म्हणूं शकतील. परंतु भूदानयज्ञाचें आंदोलन जर सरकारी धोरणाला केवळ पूरक किंवा पुस्तीवजा असें राहिलें, तर त्या आंदोलनाचें उद्दिष्ट पूर्ण होणार नाहीं. सरकारी धोरणाला जमेल तेथें पूरक राहूनहि, सरकारचें जेथें चुकत असेल तेथें त्याला मार्गदर्शन करा-यला भूदानयज्ञाच्या पुरस्कर्त्यांनीं तयार राहिलें पाहिजे. देशांत एक प्रभावी नैतिक शक्ति निर्माण करून तिच्या-योगें सरकारी धोरणाला वळण लावणें, तें धोरण बद-लून घेणें हेंच खरें भूदानयज्ञाच्या पुरस्कर्त्यांचें काम आहे. सरकारी शक्तीपेक्षां वरचढ अशी नैतिक शक्ति ते उत्पन्न करूं शकले तरच ते आपलें उद्दिष्ट साध्य करूं शकतील.

भूदानयज्ञ-आंदोलनाच्या प्रगतीचा जो कोणी तटस्थपणें व सर्वांगीण दृष्टीनें आस्थापूर्वक अभ्यास करील त्याचें हृदय आतांपर्यंत झालेल्या प्रगतीमुळें उचंबळून आल्यास नवल नाहीं. जमीनीवरील स्वामि-त्व व त्याबद्दल माणसाचें ममत्व माणसांच्या खरोखरीं इतकें हाडींमांसीं खिळलेलें आहे कीं जमीन दान म्हणून देऊन टाकणें ही गोष्ट महाकठिण आहे. असें असूनहि, आज लक्षावधि एकर जमीन दान मिळत आहे. दान देणाऱ्यांमध्यें बहुसंख्य दाते अत्यंत गरीब जमीनवाले आहेत. त्यांची जमीन थोडी असली तरी त्यांचें हृदय मोठें आहे, हा जो चमत्कार दिसून येत आहे त्यावरून आपल्या भारतांतील सामान्य माणसाचें मन किती सरळ व निर्व्याज आहे याची साक्ष पटून, आपल्या देशाला उज्ज्वल भवितव्य आहे, याची आशा वाटूं लागते. आतांपर्यंतच्या कामगिरीमुळें एक महान् नैतिक आंदोलन अशी थोर प्रतिष्ठा भूदानयज्ञाला प्राप्त झाली असून, पक्षीय राजकारणांतील कटुता, पक्षपात, व संकुचितपणा कमी करण्याच्या दृष्टीनें एक अत्यंत स्पृहणीय व्यासपीठ म्हणून या आंदोलनाकडे राजकारणी लोक पहात आहेत. आपल्या देशांतील लोकशाहीला पक्षीय राज्यकारभार व पक्षीय राजकारण हीं खरोखरीं योग्य साधनें होऊं शकतील कीं काय याबद्दलच संशय व्यक्त करण्यांत येऊं लागला आहे. अशा रीतीनें हें जें नवीन विचारमंथनाला प्रवृत्त करणारें








उच्च मानसिक वातावरण उत्पन्न झालें आहे, तें आपल्या नवजात प्रजासत्ताक राज्याच्या वाढीला फार आवश्यक आहे. भूदानयज्ञांत जें माणुसकीच्या गाभ्याला हात घालणारें सार्वत्रिक आवाहन आहे त्याचा आपल्या देशावर हळुहळु प्रभाव पडत आहे. सार्वत्रिकता हें एकजिनसी समतेचें पूर्वचिह्न होय. आणि आर्थिक समता ही तर आजची निकडीची गरज आहे.

### क्रान्तीची केवळ कुजबुज

त्याचबरोबर जर आपण चिकित्सक दृष्टीनें भूदान-यज्ञ-आंदोलनाकडे बघितलें तर आपल्या डोळ्यासमोर थोडें निराळचें चित्र उभें रहातें. चित्राची सर्वसामान्य रूपरेषा बरोबर असली तरी त्यांत दिसून येणारी रंग-संगति मनाला अजून उन्नतिकारक वाटत नाहीं. जर ह्या आंदोलनाचें उद्दिष्ट पूर्ण व्हायचें असेल तर अजून खूपच मजल मारावयाची राहिली आहे, असेंच चिकित्सक दृष्टीच्या माणसाला वाटेल. या आंदोलनाचें अंतिम उद्दिष्ट देशांत अहिंसाधिष्ठित अशी सामाजिक व आर्थिक क्रान्ति करणें हें आहे. परंतु आतांपर्यंत या आंदोलनामुळें त्या क्रान्तीची केवळ हलकीशी कुज-बुज ऐकूं येत आहे. नवजीवन देणाऱ्या क्रान्तीच्या झंझावाताचा सोसाटा अजून ऐकूं येत नाहीं. भूदान-यज्ञाला जी क्रान्तिकारक बाजू आहे तिचा विचार करतां, आपणांस कबूल केलें पाहिजे कीं क्रान्तिकारक चळवळीला लागणारा वेग, जोम आणि उष्णता उत्पन्न करण्याची शक्ति या आंदोनलांत अजून संचरलेली नाहीं. देशाच्या कोंनाकोपऱ्यांतून अजून भूदानाचा संदेश घुमलेला नाहीं. क्रान्तीला लागणारा क्रान्तिकारक उत्साह, तळमळ, धडपड आढळत नाहीं. समाजांतील सर्व थरांना घुसळून काढणारें रसायन अजून या आंदो-लनांतून तयार होतांना दिसून येत नाहीं. भारतांतील अत्यंत मोठा जो कॉंग्रेसपक्ष तो या भूदानाच्या चळ-वळीकडे आपल्या हातांतील एक दुय्यम साधन म्हणून पहात आहे. जमीनदारांना भरपाई देण्याचा प्रश्न सोडविणें या आंदोलनामुळें सोपें झालें आहे अशी तात्पुरती उपयुक्ततावादी दृष्टि कॉंग्रेसजनांची आहे. भूदानयज्ञ हा जरी सरकारला विरोध करण्याकरितां नसला तरी कॉंग्रेसपक्ष आणि त्याचें सरकार यांचीच तळी उचलून धरण्याकरितां जन्म पावलेला नाहीं. उलट, कॉंग्रेस आणि इतर राजकीय पक्ष यांना जागृत करून त्यांना कार्यप्रवण करणें हें भूदानयज्ञाचें एक कार्य आहे. एखाद्या बुभुक्षित माणसापुढें पंचपक्वान्नाचें ताट यावें, व आजूबाजूला हजारों भुकेलेले लोक उभे असतांना त्यांच्याकडे लक्ष न देतां, बेफिकीरपणें आपलें आपणच मस्त होऊन त्या अन्नावर त्या माणसानें ताव मारावा, अशी आपलपोटी बुभुक्षिताची वृत्ति कॉंग्रेस-जनांच्या ठिकाणीं सध्यां दिसत आहे.

स्वराज्यप्राप्तीनंतर कांग्रेस ही एक सुधारणावादी संघटना बनली आहे. तिचा तो जुना क्रांतिकारक आवेश निघून गेला आहे. लोकांच्या उत्साहाला भरतें आणण्याचें सामर्थ्य – जें आज भूदानयज्ञ-आंदोलनाच्या ठिकाणीं दिसत आहे – तें तिला आतां राहिलें नाहीं. भूदानयज्ञावर स्तुतिसुमनें वाहिलीं, भूदानयज्ञाच्या प्रवर्तकांबद्दल आदरभावना प्रकट केली कीं आपलें काम संपलें असें कॉंग्रेसजनांस वाटतें. ही भूदान-चळवळ केवळ भूतदयात्मक, दानधर्माची आणि नैतिक आहे, ही चळवळ त्यांचें सध्यांचें स्थान, स्वार्थ व महत्त्वाकांक्षा यांच्या आड येण्याचा संभव नाहीं, अशी त्यांची समजूत झाली आहे. हें भूदानयज्ञ-आंदोलन अव्यवहार्य आहे, आपल्या आटोक्यापलीकडचें आहे असें कॉंग्रेजनांना वाटतें. हें धार्मिक आंदोलन आहे, म्हणून आपणांस त्याचा कांहीं उपद्रव नाहीं, अशीच त्यांची समजूत आहे.

### धार्मिक आणि व्यक्तिकेन्द्रित

या भूदानयज्ञ-आंदोलनाचीं जर प्रमुख लक्षणें बघितलीं तर तीं विशिष्ट लक्षणें एखाद्या भूतदयात्मक, परोपकारी, धार्मिक आंदोलनासारखीं भासतात. क्रान्ति-कारक चळवळीचा जोर त्यांत दिसून येत नाहीं. भूदानयज्ञ-आंदोलनाच्या अंगीं देशाचें राजकारण बद-लून टाकण्याचें सामर्थ्य आहे असें फारच थोड्यांना वाटत असेल. म्हणून भूदानयज्ञ-आंदोलनाचें ध्येय सामाजिक व आर्थिक क्रान्ति घडवून आणणें हें जर मानलें तर त्याचें हलींचें हें स्वरूप हें त्याचें मोठें वैगुण्य आहे.

भूदानयज्ञ-आंदोलनांत आणखी एक वैगुण्य आहे. तें म्हणजे हें आंदोलन अजून फारच व्यक्तिकेन्द्रित आहे. आतांपर्यंत मिळालेल्या जमिनीपैकीं ७५ टक्के जमीन केवळ एका व्यक्तीच्या विभूतिमत्त्वामुळें मिळालेली आहे. जर या आंदोलनाची यशस्विता केवळ एका व्यक्तीवर








अवलंबून रहावयाची असेल तर त्यांतून इष्ट ती क्रान्ति घडवून आणणें कठिण जाईल. त्याचाच अर्थ असा कीं, अजून या आंदोलनाला सार्वत्रिकतेचें स्वरूप आलेलें नाहीं.

भूदानयज्ञ-आंदोलनाविषयीं आणखी एक गोष्ट अशी कीं त्याला जे कार्यकर्ते मिळाले आहेत त्यांच्यामध्यें क्रान्तीचें तेज पसरविण्याइतकें सामर्थ्य अजून दिसून आलेलें नाहीं. आचार्य विनोबांची गोष्टच वेगळी. त्यांच्याशिवाय जे इतर कार्यकर्ते व नेते या आंदोलनाला मिळाले आहेत ते अत्यंत उत्साही, मेहनती, कळकळीचे, सेवापरायण व नीतिमान् आहेत यांत शंका नाहीं. परंतु कांहीं अखिलभारतीय कीर्तीचे मूठभर पुढारी सोडले तर भूदानयज्ञाच्या प्रांतिक समितींतून भूदानयज्ञाचें उद्दिष्ट पूर्ण करूं शकतील असा ज्यांच्याविषयीं लोकांना विश्वास वाटेल असे कार्यकर्ते फारच तुरळक सांपडतील.

नव्या दमाची व उमेदीची ध्येयवादी तरुण मंडळी अजून या आंदोलनांत सामील झालेली नाहींत. या आंदोलनाचें प्रवर्तन व संचालन आतांपर्यंत जुन्या खंद्या विधायक कार्यकर्त्यांकडून झालेलें आहे. आंदोलन इतकें सात्त्विक व धार्मिक भूमिकेवरून चाललें आहे कीं क्रान्तिप्रिय नवीन तरुणांना त्याच्याविषयीं अजून आकर्षण वाटलेलें नाहीं. हें आंदोलन प्रामुख्यानें भूतदयात्मक आणि त्यामुळेंच सकृद्दर्शनीं अंशतः धार्मिक असल्यानें, तें क्रान्तिमय विचाराच्या माणसांना अळणी, नीरस आणि निरर्थक भासतें. त्यांत कांहीं लढाऊ, आक्रमक, जोरदार, चढाईचा कार्यक्रम आहे, असें त्यांना वाटत नाहीं. गांधीजी जेव्हां भारताच्या राजकीय प्रांगणांत अवतीर्ण झाले तेव्हां अगदीं आरंभापासूनच त्यांच्या कायदेभंगाच्या शस्त्रामुळें त्यांचें व्यक्तित्व पराक्रमाच्या तेजानें तळपत होतें. आचार्य विनोबांनीं आपल्या असामान्य नैतिक उत्कटतेनें, परिव्राजकतुल्य वैराग्यानें आणि भक्तिपूर्ण संतत्वानें जरी आपल्याभोंवतीं देदीप्यमान प्रभावलय निर्माण केलें असलें तरी त्यांच्या व्यक्तित्वाची जी एकंदरीत छाप पडते ती अशी कीं ते शेवटीं साधुपुरुष आहेत, राजकारणी नव्हेत. आंदोलनाचें ध्येय तर आर्थिक क्रान्ति घडवून आणणें हें आहे. त्याकरितां सर्व राष्ट्राचीच राजकीय शक्ति जाग्रत करून ती या एका उद्दिष्टावर केन्द्रित करणें याचीच आज विशेष गरज आहे. भूदानयज्ञानें आज शक्ति उत्पन्न केली आहे हें खरें; परंतु ती शक्ति धर्म आणि राजकारण यांमध्यें विस्कळितपणें विभागली जाऊन तिचा अपव्यय होत आहे.

भूदान–आंदोलनाला जर खरोखरीं क्रांतिकारक वळण लावावयाचें असेल तर पुढेंमागें लवकरच त्याला सत्याग्रहाची जोड द्यावी लागेल. साधुत्व, त्याग, नैतिक तळमळ हीं कांहीं ठराविक वेळांत यशस्वी व्हायची असतील तर त्यांच्यांत अधिक आक्रमकत्व व धार आली पाहिजे. कांहीं शक्ति, कांहीं दडपण आणलें तरच हें आंदोलन अधिक सामर्थ्यशाली होईल. नाहींतर भूदान–आंदोलनाच्या प्रवर्तकांवर व्यासांप्रमाणें ' ऊर्ध्वबाहुर्विरौम्येष न च कश्चित् शृणोति माम् ' असा आक्रोश करायची पाळी येईल. ज्या नीतीमागें सत्याग्रहाचा जोर नाहीं ती नीति सनातन पुराणांतलें एक पुराणें तत्त्व म्हणूनच राहील! भूदान–आंदोलन अधिक तीव्र झाल्याशिवाय, त्यांत सत्याग्रहाचा मसाला भरल्याशिवाय, कॉंग्रेस-संघटनाहि आपल्या सध्यांच्या समाधानीं वृत्तींतून, झोंपेंतून खडबडून जागी होणार नाहीं. उलट, हें आंदोलन आहे असेंच साधें, मिळमिळीत चाललें, तर कॉंग्रेसच त्याचा आपल्या स्वार्थाकरितां उपयोग करून घेईल. म्हणूनच हें आंदोलन जर क्रांतीचें साधन व्हायचें असेल तर त्याला अधिक चढाईचें, नांगीदार आणि रंगदार स्वरूप आलें पाहिजे.

## निराळ्या वळणाचें राजकारण

सर्वसेवासंघ व सर्वोदयसमाज यांचे चिटणीस श्री. शंकरराव देव यांनीं गेल्या जुलै महिन्यांत नागपूर येथें भरलेल्या कार्यकर्त्यांच्या पुढें एक भाषण केलें. त्या भाषणांत त्यांनीं जी कार्यकर्त्यांना एक सावधगिरीची सूचना दिली तिच्यामागें वर वर्णन केलेला गर्भितार्थ असावा असें वाटतें. श्री. शंकररावांच्या भाषणाचा मथितार्थ असा होता: " भूदानयज्ञ–आंदोलनाचें उद्दिष्ट धार्मिक नसून राजकीय आहे हें कार्यकर्त्यांनीं लक्षांत ठेविलें पाहिजे. निदान मी तरी तें तसें मानतों. राजकारणाचा उबग येऊन, चिडून मी राजकारण सोडलें आहे, असा जर समज असेल तर तो चुकीचा आहे. उलट, मला आज प्रत्यक्ष उत्साह राजकारणाविषयींच अधिक वाटतो. पण माझें राजकारण निराळें आहे.








माझें राजकारण अधिकारस्वीकाराचें, सत्तास्वीकाराचें नाहीं. निवडणूक, पक्ष इत्यादि तंत्रनियमांची राजकारणाला कांहीं गरज नाहीं. राजकारणाला जर कोणत्या एका तंत्राची वा नियमाची गरज असेल तर व्यक्तीच्या स्वतःच्या सदसद्विवेकबुद्धीचीच असें माझें ठाम मत आहे. माझ्या डोळ्यापुढें जें राजकारण आहे, त्यांत राजकीय पक्षाचा यांत्रिक शिस्तबाजपणा नाहीं. पक्षापेक्षां जनतेला, राजकीय पक्षांच्या घोषवाक्यांपेक्षां व्यक्तीच्या सदसद्विवेकबुद्धीलाच मी श्रेष्ठ मानतों. मला जें राजकारण अभिप्रेत आहे, त्याला माणसें पाहिजेत, मानवी यंत्रें नकोत. माझ्या राजकारणाला दरिद्री जिणें नको पण साधी संयमी रहाणी हवी आहे. माझ्या दृष्टीनें, भूदानयज्ञाच्या कार्यकर्त्यांनीं अशाच प्रकारचें राजकारण आपल्या डोळ्यापुढें ठेवावें." या भाषणांत श्री. शंकरराव देव यांनीं आपणांस अभिप्रेत असलेला राजकारणाचा अर्थ विशद करुन सांगतांना आणि अहिंसक आर्थिक क्रान्तीचें महत्त्व वर्णन करतांना असेंहि सूचित केलें कीं, जी आज संकटमय राजकीय परिस्थिति येऊन ठेपली आहे, तिची तीव्रता जर लोकांना पटवून द्यावयाची असेल तर लवकरच, अगदीं नजीकच्या भविष्यकाळांत सत्याग्रहाचा अवलंब करणें प्राप्त आहे.

अधिकारग्रहण न करतां राजकारण करायचें तर त्याकरितां उच्च नैतिक भूमिका, आणि तत्त्वनिष्ठ शुद्ध बुद्धि लागत असते. भूदानयज्ञाच्या कार्यकर्त्यांनीं या उच्च नैतिक भूमिकेवरुन जर राजकारण केलें, तर ते देशामध्यें अशी एक नवीन शक्ति निर्माण करतील कीं जी शक्ति केवळ पक्षातीत राहील एवढेंच नव्हें तर जिच्यामुळें सरकारच्या धोरणांत दुरुस्ती होऊन त्याला इष्ट व योग्य तें वळण लागेल.

### सत्याग्रहाचा अवलंब

सर्वसेवासंघ हा गांधीवादी विधायक कार्यकर्त्यांचा संघ आहे. अखिलभारतीय चर्खासंघ हा नुकताच सर्व-सेवासंघांत विलीन झाल्याकारणानें सर्व-सेवासंघाचें बळ वाढलें आहे. या सर्वसेवासंघानें सत्याग्रहाचा कार्यक्रम आंखून त्यायोगें आवश्यक त्या क्रांतिकारक उत्साहाची भूदानयज्ञाला जर जोड दिली, तर अहिंसक आर्थिक क्रान्ति घडवून आणण्याकरितां लागणारें चैतन्य क्रान्तिप्रिय लोकांमध्यें उचंबळून येईल. त्याकरितां कार्यकर्त्यांचें शिस्तशीर संघटनेचें जाळें निर्माण करावें लागेल. बेकारी नष्ट करणें, शक्य तेथें विकेंद्रित अर्थव्यवस्था स्थापन करणें, संपत्तीची न्याय्य सम वांटणी करणें – इत्यादि गोष्टींना अनुकूल ती चालना देण्याकरितां, वैयक्तिक सत्याग्रह, निरोधन, बहिष्कार इत्यादि सत्याग्रहशस्त्रांचा अवलंब करावा लागेल.

निःशस्त्र प्रतिकार आणि सत्याग्रह यांत विवेक करण्याचें शिक्षण सर्व-सेवासंघाच्या कार्यकर्त्यांना मिळालेलें आहे. आजचा काळ किती स्फोटक व ज्वालाग्राही आहे, सर्वत्र बेशिस्त कशी माजली आहे याची प्रत्येक विचारवंताला कल्पना आहे. म्हणून अहिंसक क्रान्तीचें उद्दिष्ट असलेल्या विधायक कार्यकर्त्यांना आपली सत्याग्रह-शस्त्रें वापरतांना अत्यंत जागरूक रहावें लागेल. पण या अडचणी लक्षांत घेऊनहि, जर आपलें उद्दिष्ट त्यांना लवकर साध्य करुन घ्यावयाचें असेल, तर त्यांना हा धोका पत्करावाच लागेल. हा धोका जर पत्करला आणि जर भूदानआंदोलन सत्याग्रहप्रेरित उत्साहानें ठरविलेल्या योजनेप्रमाणें चाललें, तर एका ठराविक कालमर्यादेंत लोकसेवकांची एक संघटना निर्माण होईल. स्वखुषीनें साधी, संयमी रहाणी (Voluntary Poverty) पत्करलेल्या या लोकसेवकांच्या संघटनेमधूनच राष्ट्राला पार्लमेंटच्या क्षेत्रांत व इतरत्र नव्या ताज्या दमाच्या नेतृत्वाचा पुरवठा होत राहील. नीतीची अभेद्य कवचकुंडलें ल्यालेले, अहिंसक क्रान्तीचें युद्ध लढणारे हे लोकसेवक लोकोत्तर वीरपुरुष ठरतील. कॅाँग्रेस व इतर राजकीय पक्ष यांच्यामधून जें स्वार्थसाधु, महत्त्वाकांक्षी लोकांचें पीक आलें आहे तें आपोआप नष्ट होईल. याकरितां मात्र भूदान-आंदोलनाची पुढील वाटचाल सत्याग्रहप्रेरित उत्कटतेनें व उत्साहानें झाली पाहिजे.

---








श्री. म. वि. भिडे

# गुरु नानक

[ प्रस्तुत लेखाचे लेखक श्री. म. वि. भिडे आयू. सी. एस्. यांनीं फाळणीपूर्वीच्या पंजाबमधील लाहोर येथील हायकोर्टात न्यायाधीश म्हणून काम केलें. ह्या निमित्तानें त्यांना शीख लोक व शीख धर्म यांचा जवळून अभ्यास करण्याची संधि मिळाली. त्याप्रमाणें त्यांनीं शीखांसंबंधीं एक व्यासंगपूर्वक प्रबंध लिहिला असून तो प्रकाशनाच्या मार्गावर आहे. त्या त्यांच्या प्रबंधांतील गुरु नानक यांच्या संबंधींचा भाग प्रस्तुत लेखरूपानें येथें दिला आहे. गुरु नानक यांची जयन्ती कार्तिक शु. १५ ला, येत्या २० नोव्हेंबरला येते. त्या निमित्तानें शीखांच्या धर्मसंस्थापकाचें हें पुण्यस्मरण वाचकांस औचित्यपूर्ण वाटेल. — का. सं. ]

## परमेश्वराचें वेड

गुरु नानक ह्यांचा जन्म सन १४६९ मध्यें एका मध्यम स्थितींतील 'खत्रि' ( क्षत्रिय ) जातीच्या घराण्यांत लाहोरपासून सुमारें ४० मैलावर असलेल्या तलवंडी नांवाच्या गांवीं झाला. नानक ह्यांचे वडील कालुराम नांवाचे एक गृहस्थ असून ते पटवाऱ्याचें ( –म्हणजे गांवच्या कुलकर्ण्याचें ) काम करीत असत. नानक जन्मास आले तेव्हां, मुलगा फार सुलक्षणी आहे असें ज्योतिष्यांनीं सांगितल्यामुळें घरांतील सर्वांना फार आनंद झाला. लहानपणापासूनच नानकांची धार्मिक वृत्ति व ऐहिक गोष्टींविषयीं औदासीन्य दिसून येऊं लागलें. नानक ९ वर्षांचे झाले तेव्हां पित्यानें त्यांना शाळेंत घातलें. परंतु नानकांना पंतोजींनीं दिलेल्या धड्यांत गोडी न लागून "परमेश्वरप्राप्तीच्या ज्ञानाची माहिती असल्यास मला सांगा; इतर ज्ञानाची मला इच्छा नाहीं" असें त्यांनीं पंतोजींना सांगितल्याची आख्यायिका आहे. नानकांना शेतावरचें काम सांगितलें तरी ते ईश्वरचिंतनांत मग्न असल्यामुळें शेताची गुरें-ढोरें नासाडी करीत! नानक १५ वर्षांचे झाल्यावर त्यांची हुशारी पाहण्याकरतां पित्यानें त्यास एकदा २० रुपये दिले व बाजारांत जाऊन कांहींतरी उत्तम 'सौदा' आणण्यास सांगितलें; परंतु वाटेवर कांहीं गरीब, साधू भेटले त्यांना नानकांनीं ते रुपये वाटून टाकले!

नानकांच्या वरील प्रकारच्या वर्तनामुळें त्यांच्या पित्याला फार चिंता वाटू लागून पुढें ह्या मुलाचें काय करावें हें त्यांना सुचेना. शेवटी त्यांनीं, आपले जांवई लाला जयराम नांवाचे एक गृहस्थ सुलतानपूरला राहत असत, त्यांचेकडे नानकांनीं कांहींतरी कामधंदा शिकावा म्हणून तिकडे रहाण्यास पाठवलें. तेथें गेल्यावर, त्यांनीं नानकांची दौलतखान म्हणून तेथें एक नबाब असत त्यांच्या मोदीखान्यावर नेमणूक करवली. पुढें त्यांचे सुलक्षणा नांवाच्या जवळच्या एका गांवच्या मुलीशीं लग्न पण करून दिलें. तथापि नानकांचें संसारांत लक्ष लागलें नाहीं. जें काय त्यांना मिळे तें बहुतेक ते दानधर्मांत खर्च करीत. पुढे एक दिवस अकस्मात् नानक कोठेंतरी नाहींसे झाले! मोदीखान्यावर अफरातफर केली कीं काय असा कांहींना संशय आला; पण हिशोब वगैरे तपासून पाहतां तशांतला कांहींच प्रकार दिसून आला नाहीं. उलट नानकांनीं आपलेच पैसे जास्त खर्च केले होते असें नजरेस आलें. तीन दिवस नानकांचा पत्ता लागला नाहीं. त्या दिवसांत ते अरण्यांत जाऊन समाधिस्थ बसलेले होते व त्यांना ईश्वराचा साक्षात्कार झाला असें म्हणतात. त्यानंतर त्यांनी संसारत्याग करून धर्मोपदेशाचें काम करण्याचा निश्चय केला. त्यांचा हा निश्चय समजल्यावर घरांतील सर्व मंडळींना वाईट वाटलें व त्यांनीं नानकांचें मन वळविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला पण तो व्यर्थ गेला. नानकांना बुद्धिभ्रंश होऊन वेड लागलें आहे कीं काय असा कांहींना संशय आला; परंतु त्यांनीं "मला दुसरेंतिसरें कशाचें वेड लागलें नसून फक्त परमेश्वराचें वेड लागलें आहे" असें उत्तर दिलें व आपला निश्चय कायम ठेवला.

## हिंदु व मुसलमान शिष्य

वरीलप्रमाणें निश्चय केल्यानंतर नानकांनीं आपल्या एकेश्वरी भक्तिमार्गाचा लोकांना उपदेश करण्यास सुरवात केली. नानकांनीं घर सोडल्यावर ते निरनिराळ्या








क्षेत्रांच्या स्थळीं म्हणजे हरद्वार, मथुरा, वृंदावन, काशी, जगन्नाथपुरी वगैरे ठिकाणीं गेले व अनेक साधुसंतांशीं त्यांचा समागम झाला. हिंदुस्थानच्या बाहेर म्हणजे सिलोन, ब्रह्मदेश, मक्का, बगदाद वगैरे ठिकाणीं पण ते गेल्याबद्दल आख्यायिका आहेत. परंतु या संबंधाची विश्वसनीय अशी माहिती उपलब्ध नाहीं. तथापि त्यांनीं दूरवर पुष्कळ प्रवास केला व हिंदु व मुसलमान धर्मांतील अनेक साधुसंत व फकीर यांच्याशीं त्यांचा परिचय झाला असावा याबद्दल संशय दिसत नाहीं. नानकांच्या बरोबर त्यांचा मर्दाना नांवाचा एक शिष्य असे. हा त्यांचेच गांवचा मिरासी जातीचा मुसलमान असून रबाब नांवाचें वाद्य वाजविण्यांत प्रवीण होता. हाच त्यांचा पहिला शिष्य बनला. नानक आपला उपदेश पंजाबी भाषेंत निरनिराळ्या रागांमध्यें ग्रथित केलेल्या मधुर पद्यांतून करीत. त्यांचा चेहरा रुबाबदार व वाणी रसाळ असे व तिला संगीताची जोड मिळाल्यामुळें त्यांच्या उपदेशाची श्रोत्यांच्या मनावर उत्कृष्ट छाप बसे. त्यांना हिंदु व मुसलमान दोन्ही धर्मांतील शुद्ध तत्त्वें मान्य होतीं व त्यांच्या वेषांत पण हिंदु व मुसलमान पेहराव यांचें मिश्रण असे. त्यामुळें हिंदू व मुसलमान या दोन्ही धर्मांचे लोक त्यांचा उपदेश ऐकण्यास येत. दोन्ही धर्मांतील लोक त्यांचे शिष्य होऊ लागले. ' शीख ' हा शब्द ' शिष्य ' ह्या शब्दाचा अपभ्रंश आहे. नानकांचा हेतु स्वतंत्र धर्माचा प्रचार करण्याचा नव्हता. ते फक्त धर्माचें शुद्ध स्वरूप समजावून सांगत असत व लोक त्यांना गुरु मानीत त्यामुळेंच त्यांचा उपदेश ग्रहण करणारांना ' शीख ' ही संज्ञा प्राप्त झाली.

वरीलप्रमाणें निरनिराळ्या ठिकाणीं उपदेश करीत असतांना गुरु नानकांचा शिष्यवर्ग वाढत चालला. त्यांचा ' एकेश्वरी ' धर्माचा उपदेश मुसलमानी धर्माला जुळून असल्यामुळें त्यांना मुसलमानी अंमलदारांपासून विशेष त्रास पोहोंचला नाहीं. फक्त एकदां इब्राहिम लोदी बादशहाचा त्यांच्यावर रोष होऊन त्यानें त्यांना कैदेंत टाकलें होतें; पण पुढें लवकरच इब्राहिम लोदीचा पानिपत येथें बाबर बादशहानें पराभव केला. बाबर बादशहा गादीवर बसल्यावर नानकांना बंदिवासांत टाकल्याचें त्याला समजलें तेव्हां त्यानें त्यांची भेट घेतली. तेथें त्यांच्याशीं झालेल्या संभाषणाची त्याच्या मनावर छाप पडून त्यानें नानकांना बंधमुक्त केलें.

गुरु नानक यांनीं आपल्या आयुष्यांतील बरींच वर्षें जरी अनेक ठिकाणीं धर्मोपदेश करण्यांत घालविलीं होतीं तरी त्यांनीं संन्यासवृत्ति घेतली नव्हती. शेवटीं घरीं परत आल्यानंतर ते आपल्या कुटुंबासह जालंदरजवळ करतारपूर ह्या गांवीं राहूं लागले व तेथेंच त्यांचीं आयुष्याचीं शेवटचीं ७८ वर्षें गेलीं. संसारांत राहून मनुष्यास परमेश्वरप्राप्ति करून घेतां येते अशीच त्यांची शिकवणूक असे. करतारपूर येथें असतांना त्यांनीं तेथें आपलें धर्मोपदेशाचें काम चालू ठेवलें होतें. त्यांच्या शिष्यांची संख्या दिवसेंदिवस वृद्धिंगत होत गेली. दूरदूरचे लोक त्यांच्या दर्शनास येत व त्यांचें उपदेशामृत ग्रहण करून परत जात. दर्शनास येणारे लोक जातांना गुरूंना दक्षिणा म्हणून जें कांहीं देत त्याचा उपयोग ते अतिथि व गरीब लोक ह्यांच्याकरतां ठेवलेल्या ' लंगर ' म्हणजे अन्नछत्राकडे करीत असत.

अंतकाळ जवळ आला तेव्हां गुरु नानक ह्यांनीं आपले आवडते शिष्य भाई लेहणा ह्यांना आपल्यामागें आपल्या उपदेशाची परंपरा चालविण्याकरितां 'गुरुपद ' अर्पण केलें व त्यांचें नांव गुरु ' अंगद ' असें ठेवून त्यांस त्यांनीं प्रणाम केला. त्यानंतर लवकरच सन १५३९ च्या सप्टेंबर महिन्यांत गुरु नानक ह्यांचें देहावसान झालें. गुरु नानक हे हिंदु व मुसलमान ह्या दोन्ही धर्मांतील मुख्य तत्त्वें मानणारे असल्यामुळें दोघांनाहि प्रिय असत. त्यांच्या मृत्यूनंतर त्यांचें प्रेत जाळावें कीं पुरावें असा वाद निघाला. परंतु तो संपण्यापूर्वीच त्यांचें प्रेत अदृश्य झालें व त्यांच्या प्रेतावरील चादरीचा अर्धा भाग मुसलमानांनीं पुरला व अर्धा हिंदूंनीं जाळला अशी आख्यायिका आहे.

## धर्माचें शुद्ध व व्यापक स्वरूप

गुरु नानक हे स्वतःस ईश्वरप्रेषित किंवा धर्मसंस्थापक म्हणत नसत किंवा षड्दर्शनें किंवा उपनिषदें ह्यांच्यामध्यें प्रतिपादन केलेल्या गहन तत्त्वज्ञानासारख्या गूढ विषयांवर पण ऊहापोह ते करीत नसत. त्यांची धर्मप्रेरणा अंतःस्फूर्तीपासून उत्पन्न झालेली असून ती मुख्यतः त्यावेळच्या साधुसंतांच्या समागमानें संवर्धित झालेली होती. त्या वेळीं हिंदुधर्मामध्यें नाना-








प्रकारच्या खुळया समजुती रूढ झाल्या होत्या व अर्थहीन आचारांचें बंड माजलें होतें. त्याबरोबरच पुरोहितवर्गाचें पण फार स्तोम वाढलें होतें. मुसलमानी धर्मांतहि अशाच प्रकारच्या कांहीं समजुती व आचार शिरले होते. गुरु नानकांचें मुख्य कार्य म्हणजे त्यांनीं दोन्ही धर्मांच्या विकृत स्वरूपाचा निषेध करून धर्माच्या शुद्ध स्वरूपाची लोकांना ओळख करून दिली व परमेश्वरप्राप्तीचा सुलभ उपाय जो भक्तिमार्ग त्याचा उपदेश सामान्य लोकांना समजेल अशा सुलभ रीतीनें त्यांच्या भाषेंत केला हें होय. युरोपमध्यें ह्याच सुमारास रोमन कॅथलिक पंथामधील खिश्चन धर्माच्या विकृत स्वरूपाचा निषेध करून मार्टिन लूथर ह्यांनीं जशा तऱ्हेची धर्मसुधारणा केली तशाच प्रकारचें गुरु नानक व इतर साधुसंतांनीं हिंदुस्थानामध्यें धर्मसुधारणेचें कार्य केलें, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

एका दृष्टीनें गुरु नानक ह्यांचें कार्य जास्त व्यापक स्वरूपाचें होतें. कारण गुरु नानक ह्यांची धर्माची कल्पना विश्वव्यापक अशा धर्माची होती. त्यांचा उद्देश अमुक एका धर्माचीच सुधारणा करणें असा नसून विश्वधर्माचें सत्य व शुद्ध स्वरूप लोकांच्या पुढें ठेवून त्यांना परमेश्वरप्राप्तीचा सुगम मार्ग दाखविणें हा होता.

गुरु नानक ह्यांनीं प्रतिपादन केलेल्या धर्माचें सामान्य स्वरूप थोडक्यांत असें आहे.

(१) अखिल विश्वाचा कर्ता व नियंता परमेश्वर एक आहे, (२) त्याच्यापुढें सर्व मानव समान आहेत व (३) परमेश्वरप्राप्तीचा खरा उपाय म्हणजे शुद्धाचरण व परमेश्वराची अनन्य भक्ति हाच होय.

परमेश्वर एकच आहे हें शीखधर्माचें आदितत्त्व आहे. परमेश्वराच्या स्वरूपाचें सविस्तर वर्णन गुरु नानक ह्यांच्या प्रसिद्ध ' जपजी ' नांवाच्या स्तोत्रांत उदात्त व गंभीर भाषेंत केलेलें आहे. हें स्तोत्र ' गुरुग्रंथसाहेब ' ह्या शीख लोकांच्या पवित्र ग्रंथाच्या आरंभीं असून भाविक शीख ह्याचें रोज सकाळीं पठण करतात. ह्याचा आरंभ खालीलप्रमाणें आहेः

ॐ सत्तनाम कर्ता पुरुष निरभौ निर्वैर अकाल-
मूर्ति अजूनि सैभं गुरुप्रसाद ।

ह्याला शीख लोक ' मूल मंत्र ' समजतात. ह्याचें तात्पर्य ' परमेश्वर एक असून तो सत्स्वरूप, विश्वाचा कर्ता, निर्भय, निर्वैर, कालरहित, जन्मरहित, स्वयंभू असा आहे व तो गुरुप्रसादानें प्राप्त होतो । ' असें आहे.

' जपजी ' स्तोत्राच्या ३८ ' पौडी ' म्हणजे पायऱ्या ( – अर्थात् पद्यरूपी ) आहेत व शेवटीं एक समारोपाचा श्लोक आहे. ह्यांत केलेलें परमेश्वराचें वर्णन पुष्कळ अशीं वेदान्तांतील ब्रह्माच्या स्वरूपाशीं जुळणारें असें आहे. परंतु गुरु नानक ह्यांनीं वर्णन केलेला परमेश्वर पौरुषेय स्वरूपाचा असून त्याला ' दयासिंधु ', 'विश्वावर उपकार करणारा ', ' मनुष्यांच्या कर्माप्रमाणें त्यांना पापपुण्यांचें फळ देणारा ' अशा तऱ्हेचीं विशेषणें लावलेलीं आहेत.

' परमेश्वर एक आहे हें तत्त्व तुम्हाला मान्य आहे तर तुम्ही मुसलमानी धर्मच कां स्वीकारीत नाहीं ? ' असा एकदा बाबर बादशहांनीं गुरु नानक ह्यांना प्रश्न केला होता. त्यावर त्यांनीं खालीलप्रमाणें उत्तर दिलें, अशी आख्यायिका आहेः

लख महम्मद, एक खुदाह ।
अलख सचा है, बे परवाहि ।
कइ मुहम्मद खडे दरबार ।
...... ...... ......
इक सही कीया है नानक बंदे ।
पाक खुदाइ और सब गंदे ॥

[ तात्पर्य— सत्य, अलक्ष्य परमेश्वर एक आहे. त्याच्या दरबारीं लाखो महम्मद उभे आहेत. नानकाला एका गोष्टीची पूर्ण खात्री झाली आहे. ती ही कीं एक परमेश्वरच फक्त पवित्र आहे, बाकी कशांत अर्थ नाहीं.]

वरील उत्तरावरून हें स्पष्ट दिसतें कीं शीख धर्मांमध्यें ' पैगंबर ' किंवा ' मेसाया ' ह्यांना स्थान नाहीं. प्रत्येक मनुष्याला परमेश्वरभक्तीनें स्वतःची मुक्ति करून घेतां येते. गुरु हा फक्त मार्गदर्शक होय, अशी शीखधर्माची शिकवण आहे. शीख गुरूंची परंपरा कांहीं काळपर्यंत राहिली व त्यामुळें शीख धर्माच्या संवर्धनाला मदत झाली. परंतु ही निरंतर राहिली असती तर गुरूंचेंच स्तोम माजून शीख धर्माच्या शुद्ध स्वरूपाला बाध आला असता ही गोष्ट लक्षांत घेऊन, दहावे गुरु गोविंदसिंग यांनीं दूरदर्शीपणानें गुरुपरंपरा थांबवली व आपल्यामागें 'गुरु ग्रंथसाहेब' हाच आपला गुरु मानावा अशी शीख लोकांना आज्ञा केली. त्यामुळें शीख धर्मामध्यें पुढें गुरूंचें किंवा पुरोहितवर्गाचें स्तोम माजण्यास जागाच राहिली नाहीं.








शीख धर्मांत ' पैगंबर ', ' मेसाया ' वगैरेंना जसें स्थान नाहीं तसेंच देवता, अवतार वगैरेंना पण नाहीं. 'गुरु ग्रंथसाहेबा'मध्यें हिंदुदेवतांचा वगैरे प्रसंगविशेषीं उल्लेख आहे; परंतु परमेश्वर त्यापासून भिन्न असून तो सर्वश्रेष्ठ आहे असें त्यामध्यें स्पष्ट दाखविलें आहे.

शीख धर्माचें दुसरें मुख्य तत्त्व म्हणजे ' मानवी समता ' हें होय. नानकांना जातिभेद बिलकुल मान्य नव्हता. गुरु नानक म्हणतातः

जात जनम न पुछीए ।
सा जात सा पत है ।
जे हे करम कमाई ॥

[ अर्थः जात किंवा जन्म विचारण्यांत अर्थ नाहीं. मनुष्याची खरी जात किंवा पत म्हणजे तो आपल्या कर्मांनीं जी कमावतो तीच होय ]

गुरु नानक हे जातीचे ' खत्री ' होते तरी त्यांनीं उपदेशकार्य सुरू केलें तेव्हां ते एका सुताराच्या घरीं राहूं लागले. ते मुसलमान फकीरवर्गामध्येंहि पुष्कळ मिसळत असत. जातिभेद नसल्यामुळें शीखांना भाई ( = बंधु ) ह्या अन्वर्थक संज्ञेनें संबोधण्याचा प्रघात गुरु नानकांच्या वेळेपासून सुरू झाला. शीख लोकांमध्यें सरदार ही संज्ञाहि आतां पुष्कळ प्रचारांत आहे. पण ही संज्ञा पुढें गुरु गोविंदसिंग ह्यांनीं शीख धर्माला जेव्हां क्षात्र धर्माचें स्वरूप दिलें व शीखांचें राज्य आलें तेव्हांपासून विशेषतः प्रचारांत आली असावी असें दिसतें. शीख धर्मांत जातीचा उच्चनीचभाव नसल्यामुळें हिंदुधर्मांतील कनिष्ठ जातींतील पुष्कळ लोकांनीं शीखधर्मामध्यें प्रवेश केला व त्यांची संख्या वाढत गेली.

शीखधर्माप्रमाणें मुक्तीचें खरें साधन म्हणजे परमेश्वराची एकाग्रभक्ति हेंच होय. गुरु नानक म्हणतातः—

एको पाधरु एकु दरु । गुरु पउडी निज थानु ।
रुडउ ठाकुरु नानका । सभि सुख साचउ नाम ॥

[ अर्थः एकच मार्ग आणि एकच दरवाजा (मुक्तिसाधनाचा ) आहे; आणि त्या स्थानाला जावयास गुरु ही पायरी आहे. नानकाचा परमेश्वर मोहक असून त्याच्या नामांतच सर्व सुख आहे. ]

योगादिक साधनें, तीर्थयात्रा, व्रतें वगैरेंवर गुरु नानकांचा विश्वास नव्हता. योगाविषयीं ते म्हणतातः

जोग न खिंथा जोग न डंडे
जोग न भस्म चढाइए ।
जोग न मुंडी मुंड मुंडाइए
जोग न शिंगी वाइए ॥
अंजन माहि निरंजन राहीए
जोग जुगति इक पाइए ॥

[ अर्थः योग म्हणजे कंथा किंवा दंड घेणें किंवा भस्मचर्चन, अथवा मुंडन करणें अथवा शिंगवादन करणें नव्हे. तर संसारांत राहून त्यांतील मोहांपासून अलिप्त राहणें हाच खरा योग होय ]

तीर्थाटनाविषयीं ते ' जपजी ' स्तोत्रांत म्हणतात कीं परमेश्वराच्या नामस्मरणाचें पुण्य शेंकडों तीर्थांच्या स्नानाबरोबर आहे.

वर सांगितल्याप्रमाणें गृहस्थाश्रमांत राहूनच मनुष्यास मुक्तिसाधन करतां येते अशी गुरु नानकांची शिकवणूक होती. गृहस्थाश्रमाची थोरवी ते खालील प्रमाणें वर्णन करतातः

सो गिरही जो निग्रह करहि
जप तप संजय भिखिया करहि
पुन दान का करे सरीर ।
सो गिरही गंगाका नीर ॥

[ अर्थः जो इंद्रियनिग्रह करून राहतो तो गृहस्थ जपतपादि करणाऱ्याच्या बरोबरचा समजावा. जो सतत पुण्यदान वगैरे करतो तो गृहस्थ गंगाजलाप्रमाणें पवित्र समजावा. ]

हिंदुधर्मांत निरनिराळया अनेक अर्थहीन झालेल्या संस्कारांचे व निर्बंधांचें जें स्तोम माजलेलें होतें त्यावर गुरु नानकांचा फार कटाक्ष असे. अशा गोष्टींचा चिकित्सक दृष्टीनें विचार करण्याची त्यांना लहानपणापासून सवय होती. त्यांच्या उपनयनाच्या वेळीं जानवें घालण्याचा प्रश्न निघाला तेव्हां जानवें घालण्यापासून काय लाभ होणार ह्याबद्दल उपाध्यायाशीं त्यांनीं चर्चा केली व शुद्धाचरण नसलें तर नुसतें जानवें गळयांत अडकवण्यांत अर्थ नाहीं असें त्यांनीं म्हटलें. ह्याच आशयाचें त्यांचें खालील पद्य आहे :

' दया कपाह संतोख सुतु जतु गंठी सतु वटु ।
एह जनेउ जीअका है तां पांडे घनु ॥ '

[ अर्थः दयारूपी कापसांतून संतोषरूपी सूत काढून, त्याला सत्याचा पीळ देऊन व आत्मसंयमनाची गांठ देऊन तयार केलेलें जानवें असलें तर तें मला घाला. ]











एकदा नानक हरद्वारला गेले असतांना त्यांनीं कांहीं लोकांना पूर्वेकडे तोंड करून पितरांचें तर्पण करतांना पाहिले. तेव्हां ते पश्चिमेकडे तोंड करून तसेंच करूं लागले. तेथील उपाध्येमंडळींनीं हा विपरीत प्रकार काय आहे म्हणून पृच्छा केली. त्यांवर त्यांनीं उत्तर दिलें कीं, मी आपल्या गांवीं शेतें आहेत त्यांना पाणी देत आहे ! ' येथून पाणी फेंकून शेताला पाणी पोहोंचेल असें समजणारा मूर्ख तूं कोण आहेस ? ' असा त्यांनीं सवाल केला. तेव्हां गुरु नानकांनीं उत्तर दिलें कीं ' येथून पाणी व पिंड देऊन ते स्वर्गांत पितरांना मिळेल असें समजणारांपेक्षां माझें कृत्य जास्त मूर्खपणाचें खास नाहीं ! '

नानक मक्केस गेले असतां ते एकदा पश्चिमेकडे पाय करून निजले. तें पाहून हें कृत्य मुसलमानी धर्माविरुद्ध असल्यामुळें तेथील कांहीं मुल्ला रागावले व "काबा'-कडे पाय करून निजणारा तूं काफर कोण ?' म्हणून त्यांनीं नानकांना प्रश्न केला. त्यावर नानकांनीं शांतपणानें उत्तर दिलें : " बाबांनो, रागावूं नका. मी दुरून आलेला पांथस्थ आहे. मेहरबानी करून तुम्हीच माझे पाय ज्या बाजूला परमेश्वर नाहीं त्या बाजूकडे करा म्हणजे त्यांत चूक होणार नाहीं." हें उत्तर ऐकताच नानकांच्या म्हणण्याचें रहस्य लक्षांत येऊन मुल्ला खजिल झाले.

गुरु नानक हें आपल्या उपदेशांत चित्तशुद्धि, व शुद्धाचरण ह्यांवर नेहमीं भर देत व खरा धर्म ह्यांतच आहे हें हिंदु व मुसलमान ह्या दोन्हींहि धर्मांच्या लोकांना सांगत असत. आजकाल खरा हिंदु किंवा खरा मुसलमान सांपडत नाहीं असें ते म्हणत. हिंदुधर्मांतील लोकांना जसें ते सांगत कीं नुसतें तीर्थाटन, व्रतें, वगैरेंनीं परमेश्वरप्राप्ति होऊं शकत नाहीं तसेंच ते मुसलमान धर्मांतील लोकांना सांगत कीं " खरा मुसलमान होणें फार मुष्किल आहे. जर तुम्हीं खरे मुसलमान असाल तरच मुसलमान म्हणवून घेण्यास तुम्हाला अधिकार आहे. नुसते पांच वेळा ' नमाज ' पढण्यानें मुसलमान होत नाहीं. तर त्याऐवजीं खालील प्रकारचें वर्तन म्हणजे ' नमाज ' समजून आचरण केलेंत तरच मनुष्य खरा मुसलमान होईल.

पंजि निमाजा वखत पंजि पंजा पंजे नाऊ ।
पहिली सचु हालालु दुई तीजी खैर खुदाई ।
चउथी नीअति रासि मनु, पंजवी सिफति मनाई
करणी कलमा आखिके मुसलमानु सदाइु ।

[ तात्पर्य : पांच वेळचे पांच निमाज म्हणजे सत्य, पावित्र्य, परोपकार, प्रामाणिकपणा व ईश्वरभक्ति हे समजून त्यांना सत्कृत्यरूपी कलम्यांची जो जोड देईल तोच खरा मुसलमान समजावा. ]

परमेश्वरप्राप्तीचें खरें साधन म्हणजे गुरु नानकांच्या मताप्रमाणें भक्ति होय हें वर सांगितलेंच आहे. त्यांमध्यें नामस्मरण व ध्यान ह्यावर त्यांची विशेष श्रद्धा असे. ह्या मार्गानें उचनीच, स्त्रीपुरुष सर्वांनाच मुक्ति प्राप्त करून घेतां येते, असें ते सांगत.

गुरु नानक ह्यांचा नवीन धर्म संस्थापन करण्याचा हेतु नसल्यामुळें त्यांनीं सृष्टीची उत्पत्ति, मनुष्याच्या जीविताचा हेतु, त्याचें साफल्य वगैरे गोष्टींचें पद्धतशीर रीतीनें कोठें विवरण केलेलें नाहीं. त्यांच्या पद्यांमधून आढळणाऱ्या ह्यासंबंधी बऱ्याच कल्पना हिंदुधर्मांतूनच घेतलेल्या दिसतात. उदाहरणार्थ, माया, पुनर्जन्म, कर्मफलप्राप्ति वगैरे सिद्धांत त्यांच्या पद्यांमध्यें सामान्यतः गृहीत धरलेले आहेत. त्यांची नीतितत्त्वांची उभारणी मुख्यतः पुनर्जन्माच्या तत्त्वावरच आहे. ' जसें पेरावें तसें कापावें ' ह्या म्हणीप्रमाणें मनुष्य ह्या जन्मांत पूर्वजन्मींच्या कर्मांचें फळ भोगतो व ह्या जन्मींच्या कर्मांचीं फळें त्यांस पुढील जन्मीं भोगावीं लागणार हा सिद्धान्त गुरु नानकांच्या पद्यांतून पुष्कळ ठिकाणीं प्रतिपादन केलेला आढळतो. भवचक्रांतून सुटून मुक्ति मिळविणें असेल तर त्याला मार्ग म्हणजे चित्तशुद्धि व शुद्धाचरण ठेवून परमेश्वराची अनन्यभावानें भक्ति करणें हा होय, हें त्यांच्या उपदेशाचें सार आहे.

गुरु नानक ह्यांचे धर्मविषयक विचार व त्यांचा उपदेश समजण्याचें मुख्य साधन म्हणजे त्यांनीं केलेली अनेक रागबद्ध पद्यें होत. हीं पद्यें जुन्या पण साध्या पंजाबी भाषेंत रचलेलीं आहेत. हीं भक्तिरसपरिप्लुत असून त्यांतील कांहीं शीख लोकांच्या नित्य पठणांत येतात. गुरु नानक ह्यांनीं स्वतंत्र ग्रंथरचना वगैरे कांहीं केली नाहीं. त्यांचीं पद्यें त्यांच्या शिष्यमंडळांत प्रचलित होतीं. तीं पुढें पांचवे गुरु अर्जुनसिंग ह्यांनीं ' गुरुग्रंथसाहेबा'ची रचना केली तेव्हां त्यामध्यें गोंविलीं गेलीं. हीं पद्यें मुख्यतः ह्या ग्रंथाचे पहिल्या मोहल्ल्यांत ( म्हणजे भागांत ) ग्रंथित केलेलीं आहेत.








प्रा. स. का. दीक्षित

## आद्य भारतीय प्राचीनलेखसंशोधक

# आचार्य बाळ गंगाधरशास्त्री जांभेकर

'एपिग्रॅफी' (Epigraphy) हें प्राच्यविद्येंतील एक महत्त्वाचें, पण अवघड शास्त्र आहे. या शास्त्रांत ताम्रपट, शिला, विटा, मडकीं इत्यादिकांवर लिहिलेल्या किंवा कोरलेल्या प्राचीन लेखांच्या सर्वाङ्गीण अध्ययनाचा अन्तर्भाव होतो. मराठींत याला 'पुरालेखशास्त्र' असें नांव आहे. या शास्त्राच्या अभ्यासकाला 'एपिग्रॅफिस्ट' ('पुरालेखशास्त्रज्ञ') असें म्हणतात. प्राचीन लेख (Inscriptions) हे प्राचीन इतिहासाच्या मनोऱ्याच्या विटाच मानतां येतील. हिंदुस्थानांत प्राचीन लेखांचें हें शास्त्र 'शास्त्र' या पदवीला नेण्याचें श्रेय गेल्या शतकाच्या पूर्वार्धांत या विषयांत संशोधन केलेल्या ज्या थोड्या व्यक्तींना देणें शक्य आहे, त्यांत आचार्य बाळ गंगाधरशास्त्री जांभेकर यांची गणना प्रामुख्यानें केली पाहिजे. त्यांच्या व्यतिरिक्त असलें श्रेय देण्यास पात्र असलेल्या इतर सर्व व्यक्ती पाश्चात्त्य होत्या एवढी गोष्ट लक्षांत ठेविली म्हणजे त्यांचें ह्या क्षेत्रांतील असामान्य कर्तृत्व लक्षांत येईल. तसेंच एका शतकाहून अधिक वर्षांपूर्वी त्यांनीं अशा एका अवघड व मूलगामी विषयाला हात घातला तरी कसा, याचें आश्चर्य वाटल्यावांचून राहत नाहीं.

कोणत्याहि थोर पुरुषाच्या कामगिरीचा विचार करावयाचा म्हणजे तो सर्वांगांनीं व्हावयाला पाहिजे. येथें आपणांस केवळ आचार्य बाळ गंगाधरशास्त्र्यांच्या 'पुरा-लेख-शास्त्रां'(Epigraphy)तील कामगिरीविषयींच विचार कर्तव्य आहे. ज्या कालखंडांत त्यांच्या अल्पायु जीविताची प्रभा अनेकमुख कार्याच्या रूपानें प्रज्वलित झाली, त्या कालखंडाची प्राच्यविद्या किंवा पुरातत्त्व (Archaeology) या दृष्टीनें यथार्थ कल्पना येण्याकरितां कांहीं गोष्टी सांगणें आवश्यक आहे. त्या काळीं आचार्य बाळशास्त्र्यांच्यापेक्षां वयानें चार वर्षांनीं वडील असलेल्या सर जेम्स फर्गसन् या विद्वान शिल्पशास्त्रज्ञानें आपल्या कामास प्रारंभ केला होता. त्यांच्याहून सहासात वर्षांनीं लहान असलेल्या सर मोनियर वुइल्यम्स या विद्वानानें आपलें संस्कृतांतील प्रावीण्य मिळवावयाला सुरुवात केली होती. या दोन्ही पाश्चात्त्य पंडितांचे विख्यात ग्रंथ बाळशास्त्र्यांच्या निधनानंतर प्रसिद्ध झाले, ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे प्राच्यविद्येच्या किंवा पुरातत्त्वशास्त्राच्या अध्ययनाचा नुकताच कोठें श्रीगणेशा झाला होता, आणि त्या शास्त्राचे कांहीं महत्त्वाचे आधारस्तंभहि उभारले गेलेले नव्हते, हें समजून येईल. सर ॲलेक्झँडर कनिंगहॅम, डॉ. जे. जी. ब्यूलर, डॉ. मॅक्स म्यूलर प्रभृति पाश्चात्त्य विद्वानांनीं व डॉ. राजेन्द्रलाल मित्र, डॉ. भाऊ दाजी, डॉ. भगवान्‌लाल इंद्रजी, डॉ. रा. गो. भांडारकर प्रभृति भारतीय विद्वानांनीं आपल्या प्रचंड कार्यास प्रारंभ केला, तो या नंतरच्या काळांत—म्हणजे सुमारें १८५० नंतर. अर्थात् आचार्य बाळशास्त्र्यांच्या कार्याचें मूल्यमापन करतांना, या व इतर अनेक प्राच्यविद्याविशारदांनीं आजवर उपलब्ध करून दिलेल्या ज्ञानाच्या शिखरावरून आपण त्यांच्याकडे पाहातां कामा नये; तर तत्पूर्वींच्या परिस्थितीच्या मानानें त्यांनीं कोणती, कोणत्या प्रतीची, किती थोड्या अवधींत केवढी कामगिरी केली, हेंच मुख्यत्वेंकरून आपण पाहिलें पाहिजे; इतकेंच नव्हे, तर त्या त्या काळांतील विद्वानांच्या पुढें येणाऱ्या अडचणीहि आपण लक्षांत घेतल्या पाहिजेत.

आचार्य बाळशास्त्री जांभेकर यांनीं आपल्या अलौकिक व प्रभावी गुणांमुळें तत्कालीन अनेक पाश्चात्त्य विद्वानांचें लक्ष्य आपणांकडे वेधून घेतलें होतें. लोकविलक्षण स्मरणशक्ति, अव्याहत व गाढ










व्यासंग, नानाशास्त्रप्रवीणत्व, बहुभाषाकोविदत्व, इंग्रजी-लेखनप्रभुत्व, समतोल विचारसरणी इत्यादि गुणसमुच्चयामुळें समकालीन विद्वानांवर त्यांनीं फारच थोड्या अवधींत आपल्या बुद्धिमत्तेची चांगलीच छाप पाडली. रॉयल् एशिॲटिक सोसायटीच्या मुंबई शाखेच्या नियतकालिकांतून जवळजवळ प्रारंभापासूनच त्यांनीं कांहीं महत्त्वाचे पुरालेख प्रसिद्ध करण्यास आरंभ केला. त्यांचा पहिला लेख या नियतकालिकाच्या पहिल्या पुस्तकाच्या दुसऱ्या अंकांत ऑक्टोबर १८४१ मध्यें प्रसिद्ध झाला असून त्यांच्या हयातींतील शेवटचा लेख जुलै १८४५ मध्यें ( पुस्तक २ अंक १० ) आणि मृत्यूनंतरहि अंक ११ मध्यें आणखी एक लेख ( जुलै १८४७ ) प्रसिद्ध झाला. प्रस्तुत नियकालिकाचे १८४७ पर्यंत जे एकूण फक्त ११ अंक निघाले त्यांतच असे एकूण १४ लहानमोठे लेख आचार्य बाळशास्त्री जांभेकर यांनीं या शास्त्रांत लिहिले. आपल्या संशोधनाच्या प्रारंभींच्या वर्षांत एवढ्या थोड्या अवधींत इतके लेख लिहिण्याचें श्रेय या क्षेत्रांत थोड्यांनाच असेल. त्यांच्या लेखांची जंत्री खालील प्रमाणें करतां येईल.

(१) जैनांचें पुण्यक्षेत्र शत्रुंजय किंवा पालिटाणा येथें विक्रमसंवत् १६४९–५० मध्यें तेजःपाल नांवाच्या एका धनाढ्य सोनारानें एक मोठें जैन मंदिर बांधिलें. तें कोणीं, केव्हां, कोणाकोणाच्या साहाय्यानें बांधिलें याविषयीं सविस्तर माहिती देणाऱ्या एका शिलालेखाचा उत्तरभाग बाळशास्त्रयांनीं प्रथम भाषान्तरित केला ( अं० २, पृ. ६३–६६ ), आणि नंतर मुळांत प्रसिद्ध केला ( अं० ३, पृ. १००–१०३ ). प्रो. ए. बी ऑर्लेबार यांनीं दुसऱ्या एका शास्त्र्याच्या साहाय्यानें याचा पूर्वभाग त्याच्याबरोबरच भाषान्तरित व प्रसिद्ध केला. हे दोन निरनिराळे लेख असें कल्पून, प्रो. ऑर्लेबार यांनीं त्याविषयीं असे उद्गार काढले आहेत : “ The last two inscriptions are in so bombastic a style that it was difficult to translate them so as to be intelligible and at the same time to preserve at all the character of the originals. ” ( अं० २, पृ. ५७ ). भारतीय पुरालेखशास्त्रांतील सर्वांत थोर शास्त्रज्ञ डॉ. एफ्. कीलहॉर्न् यांनीं हा समग्र लेख ‘एपिग्राफिया इंडिका’च्या दुसऱ्या विभागांत (पृ. ५०–६४) प्रसिद्ध केलेला आहे. त्याची तुलना ऑर्लेबार व बाळशास्त्री यांनीं प्रसिद्ध केलेल्या विभागाशी केली असतां असें स्पष्ट दिसून येतें कीं, ऑर्लेबारच्या व कीलहॉर्न्च्या वाचनामध्यें बराच फरक असून ऑर्लेबार यांचें वाचन अनेक ठिकाणीं निःसंशय चुकीचें होतें. याच्या उलट बाळशास्त्र्यांचें वाचन कीलहॉर्नच्या वाचनाशीं अगदीं जुळून असल्याचें दिसतें. इतकेंच काय, पण ज्या शब्दांचें वाचन बाळशास्त्र्यांनीं केवळ शक्य असें मानिलें आहे, अथवा जशी दुरुस्ती करावयास पाहिजे असें त्यांनीं सुचविलें आहे, तें तसेंच असल्याचें डॉ. कीलहॉर्न्नें मानिलें आहे. यावरून डॉ. कीलहॉर्न् यांचा आचार्य बाळ गंगाधरशास्त्र्यांच्या सूचना योग्य असल्याविषयीं किती विश्वास होता तें दिसून येतें. त्यांच्या लेखांत कांहीं उघडउघड लेखनाच्या किंवा ‘ मुद्राराक्षसा’च्या चुका झालेल्या आहेत. त्या दृष्टीआड केल्या, तर आम्हास तरी अर्थावरून असें वाटतें कीं, क्वचित् दोघांच्या मतभेदाच्या ठिकाणीं ( उदा०– श्लोक ३७ व ३९ यांमध्यें, पदटीपांत उल्लेखिलेल्या शब्दांच्या readings किंवा वाचनाच्या बाबतींत ) डॉ. कीलहॉर्नपेक्षां बाळशास्त्र्यांचें वाचन अधिक सरस आहे. अर्थात्, यावरून डॉ. कीलहॉर्नपेक्षां त्यांची ‘ पुरालेखज्ञ ’ म्हणून योग्यता अधिक मोठी होती, असें नव्हे. बाळशास्त्र्यांनीं वाचलेल्या विभागाचा प्रारंभ असा आहे :— “ इतश्च आभूरान्वय पद्मपद्मसवया उकेसन्वंशेभव ( वः ) श्रेष्ठी श्रीशिवराज इत्यभिधया सौवर्णिकः पुण्यधी ( धीः ) । ”. येथें कीलहॉर्नहि ‘ आभूर’च वाचतात. यावरून असें वाटतें कीं, मूळ लेखांतच ही चूक झाली आहे. ती शुद्ध करून ‘ आभीर ’ असें वाचलें पाहिजे. याचा अर्थ असा कीं, तेजःपाल हा सोनार ‘ श्रेष्ठी ’ (=सेठ) श्रीशिवराज या नांवाच्या ‘ आभीर ’ जातींतील ‘ सौवर्णिका ’ ( = सोनारा ) चा वंशज. आज पुण्यांत सोन्यामारुतीजवळील सराफ-आळींत जे सोनार आहेत, ते बहुतेक ‘ अहीर ’ जातीचे आहेत. ते स्वतःला अहीर सुवर्णकार असें म्हणवितात. आभीर सौवर्णिकांच्या किंवा ‘ अहीर ’ सुवर्णकारांच्या कांहीं शाखा खानदेश, पश्चिम-वऱ्हाड इत्यादि विभागांतहि आज आढळतात. तेजःपालासारखे दानशूर श्रीमन्त या










ज्ञातीचेच होते, असें या लेखावरून सिद्ध होतें; आणि आजपर्यंत लक्ष्मी या ज्ञातीची सेवा करीत आली आहे, असें दिसतें. अर्थात् या गोष्टी बाळशास्त्री किंवा डॉ. कीलहॉर्न यांनीं मांडिलेल्या नाहींत. ही चूक अशीं दुरुस्त केलेली नाहीं. तथापि एक कुतूहलाची गोष्ट म्हणून ही येथें सांगितली आहे.

हा लेख व त्याचें बाळशास्त्र्यांनीं केलेलें भाषान्तर बरबर तपासलें असतां असेंहि दिसतें कीं, "एभि-र्विश्वविसारिभिर्द्युतिभरैः ......" (श्लोक ६५) या श्लोकाचें भाषान्तर त्यांना बरोबर करतां आलें नाहीं. प्रो. ऑर्लेबार यांनीं या कवितेला "bombastic" असें विशेषण लावलें तें असल्याच श्लोकांमुळें. यापेक्षां कितीतरी सोप्या श्लोकांचीं भाषांतरें पुण्या-मुंबईच्या कित्येक प्राध्यापकांनीं किती चुकीचीं केलीं याची ज्याला थोडीफार माहिती आहे, त्याला असल्या चुकांविषयीं फारसें आश्चर्य वाटणार नाहीं. उलट, बाळशास्त्र्यांचें इंग्रजी भाषांतर वाचलें म्हणजे त्या काळांत या परकीय भाषेवर त्यांनीं एवढें प्रभुत्व मिळविलें कसें याचेंच आश्चर्य वाटेल !

(२) बाळशास्त्र्यांच्या दुसऱ्या लेखांत गिरनार येथील 'राय खिमगार'च्या महालाच्या प्रवेशद्वारांत सांपडलेल्या एका पुरालेखाचें भाषान्तर आहे. या पुरालेखाचा प्रारंभींचा कांहीं भाग त्रुटित असल्यानें त्याचा संपूर्ण अर्थ लागणें तूर्त तरी शक्य दिसत नाहीं. हा पुरालेख यादव घराण्यांतील 'महिपालदेवा'चा पुत्र 'मण्डलिक' याच्या काळांतील आहे. या घराण्याचा पहिला ऐतिहासिक पुरुष म्हणून '.नवघन' नांवाच्या राजाचा उल्लेख केलेला आहे; तो त्या लेखाच्या अर्धवट नक्कले-( imperfect facsimile )वरून असा दिसतो—

"नवघननृपतिस्तदीयसूनु-
र्नवघनमाहितव्रजे समादधानः।
नवघनवृष्टि (–सृजा) प्रजावतोपे
नवघनसारसहग्यशाभिरामः॥"

याचें व इतर अवघड श्लोकांचें बाळशास्त्र्यांनीं केलेलें भाषान्तर सामान्य अर्थग्रहणाच्या दृष्टीनें बरें साधलेलें दिसतें.

वरील दोन्ही पुरालेख आधुनिक देवनागरीला अगदी जवळ असल्यानें, वाचनाच्या दृष्टीनें बरेच सोपे होते. यानंतर त्यांनीं अवघड लेखांना हात घातला.

(३) कोंकणांतील विजयदुर्गाजवळ खारेपाटण नांवाचें एक गांव आहे. तेथें 'सिलार' ('शिलार' किंवा 'शिलाहार') नांवाच्या एका मांडलिक राजघराण्यांतील 'रट्टराज' नांवाच्या राजाचा ताम्रपट सांपडला आहे. त्यांत प्रथम सम्राट् राष्ट्रकूट घराण्याचा बराचसा इतिहास व त्याच्याशी या 'सिलार' वंशांतील प्राचीन राजांचा संबंध कसाकसा आला याविषयीं माहिती दिलेली आहे. त्यानंतर 'कक्कल' नांवाच्या राजाच्या कारकीर्दींत या घराण्याचा अंत कसा झाला, आणि त्याच्या पश्चात् चालुक्य घराण्यांतील राजा तैलप व त्याचा मुलगा सत्याश्रय यांना सम्राट्पद कसें मिळालें याविषयीं माहिती दिलेली आहे. रट्टराज हा या सत्याश्रयाचा सामन्त असून, त्यानें अव्वेश्वराच्या देवळांत पूजाअर्चा करणाऱ्या कांहीं 'मत्तमयूर' नांवाच्या गोसाव्यांना 'कूष्मांडी' इत्यादि गांवें इनाम दिलीं.

हा पुरालेख आधुनिक देवनागरीपेक्षां निराळया वाटणाऱ्या लिपींत लिहिलेला आढळतो. या लेखाच्या वाचनांत बाळशास्त्र्यांकडून अनेक चुका झाल्या आहेत, असें पुरालेखशास्त्राचा कोणीहि आधुनिक तज्ज्ञ म्हणेल. तथापि यांतील बहुतेक 'चुका' पद्धतीच्या किंवा मांडणीच्या आहेत. उदा०—ताम्रपटांत 'चण्डदण्ड' असे शब्द असतांना बाळशास्त्र्यांनीं 'चंड-दंड' असें वाचलें आहे; सर्व लेखभर अनुनासिक व्यंजनांचे 'अनुस्वार' करून टाकले आहेत. तसेंच श्लोक पूर्ण झाल्यावर, मुळांत क्रमांक नसतांना त्यांनीं ते दिले आहेत. अर्थात् या कांहीं खऱ्या 'चुका' नव्हत. अशा 'चुका' वगळल्या, तरी 'खोटिकाख्यः' याच्या ऐवजीं 'ग्योटिकाख्यः', 'परभट्टारक' याच्या ऐवजीं 'परम उद्धारक', 'च कूष्माण्डीग्रामः' याच्या ऐवजीं 'शान्तष्माण्डीग्रामः', श्रीरट्टराजः' याच्या ऐवजीं 'श्रीरहुराजः' अशा सारख्या अनेक चुका आपणांस आढळून येतील. तरी पण हें शास्त्र त्या काळांत अगदीं बाल्यावस्थेंत होतें, ही गोष्ट लक्षांत ठेविली, म्हणजे या चुकांचें महत्त्व फारसें नाहीं, तर या प्रयत्नांचेंच मोठें महत्त्व आहे, ही गोष्ट लक्षांत येईल. एकूण भाषान्तर व टीका यांच्यासह आचार्य बाळशास्त्र्यांचा हा लेख (विभाग ५, पृ. २०९–२२४) सुमारें १५ पृष्ठांचा आहे. त्याची मांडणी सांगोपांग










चर्चेसह जवळ जवळ आधुनिक पद्धतीनें केलेली दिसते. या चर्चेंत तद्विषयक इतर लेख तुलनेला घेऊन त्यांनीं ज्या पद्धतीचा अवलंब केलेला आहे, तीच पुढें डॉ. कीलहॉर्न्, डॉ. फ्लीट्, डॉ. ब्यूलर, डॉ. भांडारकर-पितापुत्र, रा. ब. का. ना. दीक्षित, म. म. मिराशी, डॉ. अळतेकर प्रभृति विद्वानांनीं अनुसरलेली आहे.

प्राचीन अक्षरांचें वैशिष्ट्य या पुरा-लेखांत कसें दिसतें, याच्या साहाय्यानें दुसऱ्या एका पुरालेखाच्या वाचनांत किंवा अर्थांत झालेल्या महत्त्वाच्या चुका कशा शुद्ध करतां येतील, यांतील भौगोलिक उल्लेखांचें प्रचलित नांवांच्या साहाय्यानें स्पष्टीकरण कसें करतां येईल इत्यादि अनेक विषयांचा बाळशास्त्र्यांनीं योग्य तो ऊहापोह केलेला आहे. स्वतःला 'पुरालेखज्ञ' म्हणविणाऱ्या अनेक आधुनिक विद्वानांनीं कित्येक पुरालेख छापतांना या विषयांकडे जें दुर्लक्ष्य केलेलें दिसतें, त्यावरून तर आचार्य बाळशास्त्री जांभेकरांच्या बुद्धिमत्तेचें कौतुकच वाटतें. डॉ. कीलहॉर्न् यांनीं हाच पुरालेख पुनः 'एपिग्राफिया इंडिका'च्या तृतीय ग्रंथांत (पृ. २९२–३०२) प्रसिद्ध केला आहे; त्यांत त्यांनीं अनेक बाबतींत आपल्या ज्ञानांत भर घातली आहे; तथापि आपणांसहि भौगोलिक नांवांच्या बाबतींत पुरेसें यश मिळालें नाहीं, अशी त्यांनीं कबुली दिली आहे, आणि यावरून हा विषय किती अवघड आहे, आणि 'Not failure, but low aim is crime' हे लक्षांत येईल.

(४) या वरील लेखानंतर बाळशास्त्र्यांनीं नागपूर येथें सांपडलेला एक मोठा शिलालेख सटीक व सभाषान्तर प्रसिद्ध केला (अं. ६. पृ. २५९–२८६). तो विक्रमसंवत् ११६१ चा असून, माळव्यांतील परमार राजघराण्यांतील लक्ष्मदेव राजाच्या कारकीर्दीतील आहे. त्यानें एक देवालय बांधिलें आणि त्या देवालयाला त्याचा धाकटा भाऊ नरवर्मदेव यानें 'मोकल पाटल' नांवाचें एक गांव इनाम दिलें, असा या शिलालेखांत उल्लेख आहे. लक्ष्मदेवराजाच्या पराक्रमाचें वर्णन करतांना शिलालेखांत खालील सुंदर श्लोक आढळतो :

"खेलोत्खाततुरुष्कदत्तविलसद्राहावलीवेल्लन-
त्क्षाम्यत्कुङ्कुमकेसराधिकमृदौ वंक्षूपकण्ठस्थले ।
येनावास्य सरस्वतीसविधतासाधिक्यवाक्पाटव-
श्चाद्रुनुत्कटपत्रिपञ्जरगतः कीराधिपोऽध्याप्यत ॥ "

यांतील 'वंक्षु' (=Oxus) नदीचें नांव बाळशास्त्र्यांनीं 'वंकु' असें चुकीचें वाचलें; त्याचा आणि 'सरस्वती' व 'कीर' या शब्दांवरील कोट्यांचा अर्थ लक्षांत न आल्यामुळें, त्यांच्या येथें दोनतीन भौगोलिक चुका झाल्या आहेत. 'कीर' म्हणजे 'पोपट', तसेंच 'कीर नांवाच्या सरस्वतीनदीजवळील देशाचा राजा' या दोघांचा, विशेषतः दुसऱ्याचा येथें उल्लेख आहे. या श्लोकाच्या पहिल्या चरणाचा अर्थ त्यांना नीट समजला नाहीं आणि लेख छापतांना इतरहि कांहीं किरकोळ चुका त्यांच्या हातून झालेल्या दिसतात. तथापि या मोठ्या लेखाच्या मानानें, या त्याच्या पहिल्या प्रसिद्धीकरणाच्या प्रयत्नांत झालेल्या चुका कांहींच नव्हत, असेंच कोणीहि निःपक्षपाती मनुष्य म्हणेल. त्यांनीं इंग्रजींत प्रसिद्ध केलेल्या या लेखानंतर, हा पुरालेख प्रो. लासन् (Lassen) या जर्मन् पंडितानें जर्मन् भाषेंत पुनः प्रसिद्ध केला आणि त्यांत बाळशास्त्र्यांवर त्यानें कडक टीका केली. परंतु त्यानंतर डॉ. कीलहॉर्न् या प्रख्यात जर्मन पंडितानें हा लेख पुनः 'एपिग्राफिया इंडिका'च्या ग्रंथांत प्रसिद्ध केला, तेव्हां त्यानें प्रो. लासनच्या टीकेविषयीं आणि बाळशास्त्र्यांच्या व त्यांच्या भाषांतरांतील गुणावगुणांविषयीं खालीलप्रमाणें उद्गार काढलेले आहेत :

"I may say that Professor Lassen once or twice has unjustly censured the Hindu translator for having misunderstood the original, in passages, where the English translation, if not altogether correct, shows its author to have had a fairly accurate idea of what the writer of the original meant to say. And I must add that, for the proper understanding of some really difficult verses, more help may be derived from the English than from the German translation." –(Epigraphia Indica, Vol. II, p. 180).

या शिलालेखांतील खालीं उद्धृत केलेल्या एका श्लोकांत 'हरि-हर' (किंवा 'शिव–नारायण') या देवतेचें संयुक्त रूप वर्णन केलेलें दिसतें :

'वैराग्यं च सरागतां च नृशिरोमालां च माल्यानि च
व्याघ्रानेकपचर्मणी च वसने चाहींश्च हारादि च ।
यद्भूतिं च विलेपनं च भजते भीमं च भव्यं च त-
द्दिश्याद्रूपमुमारमारमणयोर्भुक्तिं च मुक्तिं च वः ॥'

या श्लोकांत वैराग्य, नृशिरोमाला, 'व्याघ्रानेकपचर्मणी', अहि, भूति (= भस्म), भीम, उमा इत्यादि शब्दांचा संबंध शंकराकडे आहे, तर सरागता, माल्य, 'वसने', हार, विलेपन, भव्य, रमा इत्यादि शब्दांचा संबंध विष्णूकडे आहे, ही गोष्ट बाळशास्त्र्यांनीं स्पष्ट केली आहे. तथापि हें 'हरि-हर' या संयुक्त रूपाचें वर्णन आहे ही गोष्ट त्यांच्या लक्षांत आलेली नाहीं, असें त्यांनीं 'रूप' याचा 'figures' असा बहुवचनी अर्थ केल्यावरून वाटतें. [ 'व्याघ्रचर्म' व 'अनेकपचर्म' ( = द्विपचर्म ) हीं शंकराचीं असल्याचें संस्कृतज्ञांस विदित आहेच. 'यः स्वयं कृत्तिवासाः', 'गजाजिनालम्बि' इत्यादि शब्दप्रयोग कालिदासीय ग्रंथांच्या अभ्यासकाला परिचित असतातच. ] या श्लोकाचें बाळशास्त्रिकृत व डॉ. लॅसनकृत भाषांतर वाचलें म्हणजे डॉ. कीलहॉर्न् बाळशास्त्र्यांच्या भाषांतराची कां प्रशंसा करितो हें लक्षांत येईल. तें अधिक सोपें व सुबोध आहे हें निश्चित.

( ५-६ ) यानंतर १८४४ मध्यें आचार्य बाळशास्त्र्यांनीं दोन चालुक्य राजांचे पुरालेख सटीक, सभाषान्तर प्रसिद्ध केले ( अं० ८, पृ. १ – १२ ). या लेखांचें वैशिष्ट्य असें कीं, हे दोन्ही मागील कोणत्याहि लेखापेक्षां अधिक प्राचीन, अतएव वाचण्यास अवघड आहेत. निष्णात पुरालेखज्ञालासुद्धां हे लेख वाचतांना थोडे कठीण वाटावेत. तथापि हे दोन्ही लेख त्यांनीं विशेष चुका न करतां वाचलेले दिसतात. यांपैकीं पहिल्या लेखांत " भीमरथीदक्षिणतटे अलंदतीर्थ(र्थे) नाम ग्रामः " असा भीमानदीच्या दक्षिणेकडील प्रदेशांत असलेल्या, पुण्याजवळील आळंदी या क्षेत्राच्या गांवाचा उल्लेख आहे, हें त्यांनीं दाखवून दिलें आहे. या दोन्ही लेखांचें वाचन त्यांनीं कसें केलें, तें त्यांनीं दुसऱ्या लेखाविषयीं लिहिलेल्या माहितीवरून सहज लक्षांत येईल (पाहा – अं. ८, पृ. ६) : "By the help of Mr. Princep's table of the Indian Alphabets, I succeeded in reading the whole of the inscription without much difficulty. The character, in which it is written, will be found to bear a close resemblance to that of the Allahabad Pillar ... "

( ७-१३ ) यानंतर बाळशास्त्र्यांनीं कोल्हापूरच्या महालक्ष्मीमंदिराच्या आवारांत व आसमंतात् सांपडलेल्या सात शिलालेखांचा सारांश आणि त्यांपैकीं एका महत्त्वाच्या शिलालेखाचें भाषांतर वाचकांस सादर केलें. वेळेच्या अभावीं, शास्त्रीय रीतीनें नक्कल काढून त्यांना हें काम करतां आलेलें नाहीं, असें त्यांनीं स्वतःच या लेखाच्या प्रस्तावनेंत म्हटलें आहे. यांत मूळ लेख, त्याचें शास्त्रशुद्ध भाषांतर किंवा सांगोपांग चर्चा इत्यादि कांहीं नसून या सातहि लेखांची पृष्ठसंख्या अगदीं थोडी ( अं. १०. पृ. २६३ – २७२ ) आहे. यांचें महत्त्व, हे त्यांनीं स्वतःच्या हयातींत प्रसिद्ध केलेले शेवटचे लेख, या दृष्टीनेंच आहे.

यांपैकीं पहिल्या लेखांत कोल्हापूरच्या महालक्ष्मीला दुपारच्या पूजेच्या वेळेला चांगले मोदक मिळावेत म्हणून चालुक्य– घराण्यांतील सोमदेव नांवाच्या राजबांधवानें एका गांवाचें इनाम दिलें, असा उल्लेख आहे. दुसरा व तिसरा लेख हे यादव घराण्यांतील नारायण राजाच्या कारकीर्दींतील आहेत. चवथ्या लेखाच्या एका भागांत ( –किंवा, हे दोन स्वतंत्र पुरालेख असतील– ) मिरज गांवाचा जुनी राजधानी म्हणून उल्लेख आहे. पांचवा लेख जैन धर्मीयांच्या दृष्टीनें महत्त्वाचा असून, असल्या लेखांवरून जैनांनीं दक्षिण महाराष्ट्रांतील संस्थानांच्या टापूंत केव्हांपासून वसाहत करावयास आरंभ केला होता तें स्पष्ट होतें. यांत कोल्हापुराचा उल्लेख 'क्षुल्लकपुर' असा केलेला दिसतो; पण बाळशास्त्र्यांनीं या बाबतींत कोल्हापुराला 'तगरपूर' नांव आहे, असें त्यांना वाटत असल्यामुळें तसें स्पष्ट सांगितलेलें नाहीं. सहाव्या लेखांत संस्कृताबरोबर जुन्या कानडीचा वापर आढळतो, असें ते लिहितात. यांत मिरज, कोल्हापूर इत्यादि ठिकाणच्या 'शेट्टी' ( –श्रेष्ठी, सेठ– ) ची सभा निंबदेवराजासमोर भरली, आणि त्यांनीं एक दान केलें, असा उल्लेख आहे. बाळशास्त्र्यांनीं या सातहि लेखांवर सारांशरूपानें जी टीका लिहिली आहे, त्यांत त्यांनीं या लेखांवरून बौद्धांचें या प्रदेशांत बरेंच वजन



अनुक्रमणिका






होतें, येथें बरेच बौद्धधर्मीय लोक राहत इत्यादि लिहिलें तें चुकीचें आहे. 'जैन' व 'जैनधर्मीय' या ऐवजीं 'बौद्ध' व 'बौद्धधर्मीय' असे शब्द येथें पडलेले आहेत.

(१४) त्यांचा शेवटचा लेख त्यांच्या मृत्यूनंतर प्रसिद्ध झाला (अं. ११, पृ. ३७१). राष्ट्रकूटांच्या सम्राट्-घराण्यांतील पहिला राजा दन्तिदुर्ग याच्या कारकीर्दींत हा पुरालेख शक वर्ष ६७५ मध्यें लिहिला गेला. याच राजाचा दुसरा एक लेख प्रस्तुत लेखकानें 'एपिग्राफिया इंडिका'च्या २५ व्या ग्रंथांत (पृ. २५–३१) प्रसिद्ध केला असून त्याचा काल शकसंवत् ६६३ असा वाचला आहे. म. म. प्रा. मिराशी यांनीं हें मत खोडून काढण्याचा प्रयत्न करून एक नवीनच सूचना मांडली आहे. त्याकडे न वळतां, बाळशास्त्र्यांच्या लेखाविषयीं आपणांस असें म्हणतां येईल कीं, याचें वाचन व अर्थ त्यांना बरे साधले आहेत; दोन्हींतल्या चुका थोड्या आहेत. यावरील टीकेंत त्यांनीं, हें दानपत्र एका (वासिष्ठगोत्री) कऱ्हाड्या ब्राह्मणाला दिलेलें होतें, असें स्पष्ट केलें आहे. या ताम्रपटाच्या अक्षरांविषयीं त्यांनीं थोडीफार सविस्तर चर्चा केली आहे. पण पुरेशा साधनांच्या अभावीं – त्याकाळीं राष्ट्रकूट घराण्याचे व इतर फारसे लेख उपलब्ध नव्हते — ती चर्चा अनुपयुक्त ठरली आहे. यानंतर या लेखाच्या अक्षरांविषयीं डॉ. व्ही. एस्. सुखठणकर व डॉ. भांडारकर यांनीं अधिक अभ्यास करून, हा ताम्रपट शक वर्ष ६७५ मध्यें लिहिला गेला नव्हता, तो पुष्कळ उशिरां लिहिला गेला, असें दाखविलें आणि हा संपूर्ण बनावट आहे, असें प्रतिपादन केलें. डॉ. अळतेकरांनीं व प्रस्तुत लेखकानें, हा नंतरच्या काळांत लिहिलेला असला तरी तो याच काळांत लिहिलेल्या एका अस्सल ताम्रपटावरून नक्कल केलेला आहे, असें प्रतिपादिलें आहे.

आचार्य बाळशास्त्री जांभेकरांनीं प्रसिद्ध केलेल्या वरील पुरालेखांचा साकल्यानें विचार केला असतां आपणांस असें आढळून येतें कीं, त्यांतील कांहीं पर-प्रांतांतील होते, आणि बहुतेक दक्षिण हिंदुस्थानांतील– विशेषतः महाराष्ट्रांतील किंवा महाराष्ट्राच्या इतिहासाशीं संबद्ध असे होते; कांहीं नंतरच्या काळांतील व प्रदीर्घ समासांनीं परिपूर्ण असे होते; तर कित्येक जुने म्हणून वाचावयाला अवघड होते. तसेंच हे सर्व लेख कांहीं एका पद्धतीचे नव्हते; नव्हे, बहुतेक भिन्नभिन्न प्रकारांचे व निरनिराळ्या राजघराण्यांविषयीं होते. त्यांची चर्चा त्यांनीं समतोल बुद्धीनें केलेली दिसते. अशा नानाविध लेखांत औत्सुक्य वाटणें किंवा गति असणें, हें चौरस व चौकस बुद्धीशिवाय अशक्य आहे. बाळशास्त्र्यांचें अल्प वय, त्यांच्या वेळच्या अडचणी व आजुबाजूच्या एकंदर समाजाच्या प्रगतीची उंची इत्यादि गोष्टी जमेला धरल्या, तर आचार्य बाळशास्त्री जांभेकर हे एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धांतील एक 'आश्चर्य'–किमानपक्षीं, एक 'रत्न' होते, असें पुरालेख-शास्त्रांतील त्यांच्या कामगिरीवरून म्हणावयाला मुळींच प्रत्यवाय नाहीं.

---

## आवर हें दान —!

पायांतील काटा । पायासह गेला
ऐसा हा भेटला । धन्वंतरि
दुःखासह गेला । घेवोनिया सुख
भूक आणि मुख । सर्वें गेलीं

प्रार्थियलें काय । काय दिलें हातीं
मातीवर माती । वाढलीस
रितेपण माझें । चघळतें रेती
मोत्यासह स्वाती । सांजावली

ऐसें मुंडलेंसी । गुंडांच्या गोपाळा–
स्वतः निराळा । राहोनिया
सुखदुःख छेद । परस्परां गेले
गणित राहिलें । शून्यलब्धि

अगा कृपावंता । आवर हें दान
टाक तें निदान दुःख माझें !

— विंदा करंदीकर

ग्रंथपरिचय : प्रा. गोवर्धन पारीख

# रशियांतील विरोधक-निःपाताच्या विविध उपपत्ती

"क्रान्ति ही आपल्या बालकांना भक्षण करणारी माता आहे." – हा अभिप्राय रशियांतील राज्यक्रान्तींतहि प्रत्ययास आला आहे. वेळोंवेळीं करण्यांत येणारा विरोधक-निःपात ( Purge ) ही रशियन राजवटींतील एक अत्यंत महत्त्वाची घटना आहे. हजारों लोकांची राज्यद्रोहाच्या आरोपावरून अटक, त्यांची चौकशी, त्यांजवरील खटले आणि खटल्यांतील अनेक आरोपींचे कबुलीजबाब हें या घटनेचें स्थूल स्वरूप होय. हें सर्व कां व कसें घडतें हें एक मोठें गूढ आहे. त्याचें स्वरूप निश्चित व स्पष्ट करण्याच्या हेतूनें आजवर झालेले प्रयत्न फारसे समाधानकारक वा यशस्वी ठरलेले नाहींत. त्यामुळें तत्संबंधीं निश्चित अनुमानें न काढण्याचीच प्रवृत्ति अजून अनेक जाणत्या लोकांत आढळते. या घटनेचा उकल योग्य रीतीनें होणें आवश्यक आहे याबद्दल मात्र दुमत होण्याचें कारण नाहीं.

या विरोधक-निःपातपद्धतीचा आरंभ १९२८ सालापासून झाला असें मानलें जातें. राज्यद्रोहाचे खटले तत्पूर्वी सोव्हिएट रशियांत झाले नाहींत असें नाहीं. उदा०, लेनिनवरील खुनी हल्ल्यानंतरच्या १९२२ सालच्या बावीस समाजवादी नेत्यांवरील खटला प्रसिद्ध आहे. तथापि त्या खटल्यांचें स्वरूप भिन्न आणि मुख्यत्वेंकरून राजकीय प्रचारहेतूनें प्रेरित झालेलें होतें. "प्रचारात्मक" खटल्यांऐवजीं "कबुलीचे खटले" साधारणपणें १९२८ पासून सुरूं झालेले आढळतात. प्रसिद्ध 'शाख्त' खटला हा अशा स्वरूपाचा पहिला महत्त्वाचा खटला होय. विरोधकनिःपाताचा हा नवा उपक्रम १९३६–३९ च्या काळांत यॅझॉव्ह हे गुप्तपोलिससंघटनेचे प्रमुख असतांना कळसास पोहोंचला, आणि त्याला सामूहिक स्वरूप ( mass character ) प्राप्त झालें. बाह्य जगाचें लक्ष प्रथमतः प्रामुख्यानें याच काळांत या घटनेकडे वेधलें गेलें. विशेषतः झिनोव्हिव्ह, कामेनिव्ह इ० (ऑगस्ट १९३६); पॅटॅकॉव्ह, रॅडेक, सोकोल्निकॉव्ह इ० (जानेवारी १९३७) आणि बुखारिन, रॉयकॉव्ह इ० (मार्च १९३८)– या तीन खटल्यांमुळें तर सगळ्या सुसंस्कृत जगाला धक्काच बसला! या जुन्या, निष्ठावंत नेत्यांचे कबुलीजबाब प्रस्तुत तंत्राबद्दल गूढता निर्माण करण्यास मुख्यत्वें कारणीभूत झाले असें म्हणतां येईल.

विरोधक-निःपाताच्या या तंत्राचा अनुभव यानंतरच्या काळांत वेळोंवेळीं आला आहे. निरनिराळ्या श्रेणींतील हजारों लोकांची अटक व निःपात हीं केवळ रशियांतच नव्हे तर इतर साम्यवादी राष्ट्रांत देखील प्रत्यहीं आढळणारीं दृश्यें होत. त्याचप्रमाणें मिड्स्झेन्टी आणि राजक (हंगेरी), कॉस्टॉव्ह (बल्गेरिया), स्लिंग (झेकोस्लोव्हाकिया), हंगेरींत नोकरीस असलेले अमेरिकन नागरिक व्होग्लर व ब्रिटिश नागरिक सॅन्डर्स, पॅटकॉव्ह (बल्गेरिया) इत्यादींचे खटले व कबुलीजबाब हेहि आश्चर्यजनक आहेत. रशियांतील बेरियाची अटक आणि त्यानंतर सुरूं झालेला जॉर्जियांतील निःपाताचा कार्यक्रम आणि पूर्वजर्मनींतून अलीकडे येणाऱ्या बातम्या इत्यादींमुळें या तंत्राबद्दल पुनः कुतूहल वाढूं लागणें स्वाभाविक आहे. यामुळें प्रस्तुत प्रश्नाची पुनः चिकित्सा होऊं लागली आहे. या चिकित्सेंत बेक आणि गॉडिन् यांच्या ग्रंथाचें[1] स्थान अत्यंत वैशिष्ट्यपूर्ण व महत्त्वाचें आहे असें म्हणतां येईल.

प्रस्तुत ग्रंथांतील चर्चा केवळ १९३६ ते १९३९ या तीन वर्षांतील घटनांपुरतीच मर्यादित असल्यामुळें तो ग्रंथ एका परीनें 'जुना' वाटण्याचा संभव आहे. परंतु त्यांतील विषयाचें महत्त्व अगदीं नवें व ताजें आहे. ग्रंथाचें खरें वैशिष्ट्य म्हणजे लेखकद्वयाचें स्थान, त्यांचा अनुभव आणि माहिती गोळा करण्याची व त्यावरून अनुमानें काढण्याची त्यांची पद्धति हें होय. लेखकद्वयापैकीं एक वैज्ञानिक आणि दुसरे इतिहासकार आहेत. त्यांनीं उभयतां बराच काळ रशियन तुरुंगांत काढला

1. 'Russian Purge and the Extraction of Confession'– By F. Beck and W. Godin.







आहे. तुरुंगांतील कैद्यांच्या चौकशीपद्धतीचा त्यांना प्रत्यक्ष अनुभव आहे. त्याचप्रमाणें अनेक निरनिराळ्या श्रेणींतील कैद्यांशीं तुरुंगाच्या कोठड्यांत केलेल्या चर्चेवरून त्यांनीं पुष्कळ माहिती मिळविली आहे आणि ही माहिती व प्रत्यक्ष अनुभव यांच्या चिकित्सेच्या आधारें निघणारीं अनुमानें त्यांनीं प्रस्तुत ग्रंथांत मांडलीं आहेत. तीं मांडतांना वस्तुनिष्ठता कायम राहिली असल्यामुळें प्रस्तुत ग्रंथाला एक प्रकारें अहवालाचें स्वरूप प्राप्त झालें आहे. गुप्तता राखण्याच्या राज्याच्या धोरणामुळें, सोव्हिएट राजवटीविषयीं बाहेरच्या जगांत आढळणारें अज्ञान सामान्य सोव्हिएट नागरिकांमध्यें देखील तसेंच असणें शक्य व स्वाभाविक आहे. यामुळें प्रस्तुत ग्रंथांत विरोधक-निःपाताच्या तंत्राबरोबरच सोव्हिएट राजवटीबद्दलच्या निरनिराळ्या अंतर्गत प्रतिक्रिया देखील समजणें शक्य झालें आहे.

खटल्यांतील कबुलीजबाब हे केवळ महत्त्वाच्या नेत्यांपुरतेच मर्यादित होत असें समजण्याचें कारण नाहीं. हजारों आरोपींनीं सकृद्दर्शनीं अगदीं असंभाव्य वा काल्पनिक वाटणारे जबाब दिलेले आहेत. सर्वस्वीं निर्दोषी असणाऱ्या अनेकांनीं लष्करी कट, बंडाळी, कारखाने, वहातुकीचीं साधनें, पूल, धरणें इत्यादि उध्वस्त करण्याच्या योजना इत्यादींत आपण भाग घेतल्याचें मान्य केलें आहे. हें कसें घडलें याबद्दलचा विस्तृत ऊहापोह प्रस्तुत ग्रंथांत नाहीं. परंतु लेखकांनीं प्रत्यक्ष अनुभवांतून चौकशीच्या तंत्रावर महत्त्वाचा व उद्बोधक प्रकाश टाकला आहे. या तंत्रानुसार आरोपीचें कार्य म्हणजे आपल्या कल्पनाशक्तीच्या साहाय्यानें स्वतःविरुद्ध सगळी 'बाजू' तयार करणें हें होय. प्रत्येकाला आपल्या गुन्ह्यासंबंधीं 'कथा' तयार करावी लागते; इतकेंच नव्हें तर ती वास्तव वा संभाव्य वाटेल अशा प्रकारें तिचा तपशील तयार करण्याची किंवा उपलब्ध तपशीलाला या दृष्टीनें आवश्यक ती मुरड घालण्याची वा वळणें देण्याची जबाबदारीहि घ्यावी लागते. तात्पर्य, आरोपीनेंच आपला गुन्हा सिद्ध करणें हें या चौकशीचें उद्दिष्ट होय आणि तें साध्य होईपर्यंत चौकशी चालू रहाते. यामुळें आपण तयार केलेली 'कथा' अवास्तव किंवा किरकोळ स्वरूपाची म्हणून नाकारली जाऊं नये यासाठीं चौकशी करणाऱ्या अधिकाऱ्यांपुढें तिच्या यथार्थतेविषयीं गयावया करून सांगणारे आरोपी अनेकवार आढळतात. आरोपीकडून अपेक्षिला जाणारा खुलासा त्याच्या निवेदनाऐवजीं त्याचें व्यक्तिमत्त्व, शिक्षण, समाजांतील व कम्युनिस्ट पक्षांतील स्थान यांवरच अवलंबून असल्यामुळें सामान्य शेतकरी किंवा कामगार साध्या कबुलीजबाबानें चौकशींतून पार पडत. उलट वरच्या श्रेणींतील आरोपींना भयंकर स्वरूपाचे गुन्हे शोधून काढणें आवश्यक होई. हे आरोपी निरनिराळ्या क्षेत्रांतील भिन्न भिन्न दर्जाचे होते. विशेषतः पक्षसंघटनेंतील कार्यकर्ते, जुने बोल्शेविक नेते, राजकीय गुन्हेगार, लष्कर व वहातुक संघटना यांमधील नेते, तंत्रविद्याकुशल कारागीर, परदेशांतील नागरिक, परराज्यांचे हस्तक, अल्पसंख्याक गट, एके काळीं संपन्न असलेले वर्ग, थोरामोठ्यांशीं संबंध ठेवणाऱ्या व्यक्ती, चुकून अटक झालेलीं माणसें इत्यादि गटांचा महत्त्वपूर्ण म्हणून लेखकांनीं उल्लेख केला आहे. गुप्त पोलिस-संघटनाहि या बाबतींत अपवाद नाहीं. सामान्यतः कोणत्याहि व्यक्तीचें ज्या मानानें स्थान मोठें, त्या मानानें तिच्या अटकेची शक्यता अधिक असें १९३६–३९ च्या परिस्थितीबद्दल मत लेखकांनीं व्यक्त केलें असून त्याच्या समर्थनार्थ अनेक पुरावेहि दिले आहेत. "प्रत्येक सोव्हिएट अधिकारी कचेरींत जातांना दोन पेट्या बरोबर घेऊन जातो; एक कागदपत्रांची आणि दुसरी आवश्यक त्या कपड्यांची आणि इतर सामानसुमानाची. प्रसंग आलाच तर तुरुंगांत उपयोग व्हावा म्हणून दुसरी पेटी असे." – या तत्कालीन विनोदांत परिस्थितीचें यथार्थ चित्रण झालें आहे असें म्हणतां येईल.

तथापि प्रस्तुत ग्रंथांतील खरा महत्त्वाचा भाग म्हणजे विरोधक-निःपाताविषयीं लेखकांनीं नमूद केलेल्या सतरा विविध उपपत्ती हा होय. या सतरा विविध उपपत्तींतील एखादी विशिष्ट उपपत्तीच पूर्णपणें खरी किंवा पुरेशी आहे असा आग्रह न धरतां प्रत्येकींत सत्याचा थोडाबहुत अंश सांपडणें शक्य आहे असें मत लेखकांनीं व्यक्त केलें आहे. ह्या उपपत्ती निरनिराळ्या श्रेणींतील कैदी आणि चौकशी करणारे अधिकारी यांच्या बोलण्यांतून निघाल्या आहेत. त्यांतील दोन 'रिट्रिब्यूशन' व 'सन्स्पॉट' या वगळल्यास इतर उपपत्ती अर्थपूर्ण आहेत. या उपपत्ती देतांना तद्विषयक आक्षेपहि लेखकांनीं नमूद केले असल्यानें त्यांच्या मूल्यमापनांत आवश्यक मार्ग-







दर्शनहि मिळत जातें. या विविध उपपत्तींचेंच प्रस्तुत लेखांत थोडक्यांत दिग्दर्शन करावयाचें आहेः

( १ ) **'अधिकृत' उपपत्ति** ( The Official Theory): ही दोन निरनिराळ्या पातळींवर आढळते. एक सामान्य नागरिक आणि परराष्ट्रें याकरितां, व दुसरी अत्यंत मर्यादित संख्येंत असलेल्या पक्षाच्या बड्या नेत्यांकरितां. यांपैकीं दुसरीविषयीं कांहींहि निश्चित सांगणें कठिण आहे. पहिली मात्र अनेक सरकारी कागदपत्रांत नमूद केलेली आढळते; म्हणून तिच्याविषयीं थोडेंबहुत स्पष्टीकरण करणें शक्य आहे.

या उपपत्तींत अटक झालेल्यांची संख्या विशेष मोठी नाहीं हें प्रथम स्पष्ट करण्यांत येतें. मात्र प्रत्यक्ष आंकडे मुळींच उपलब्ध नसल्यामुळें निश्चित अनुमान करणेंहि कठिण आहे.

साम्यवाद ही विकासाची अंतिम आणि अटळ अवस्था असून तो प्रस्थापित करण्यासाठीं कामगार-वर्गानें हस्तगत केलेली सत्ता त्याच्या म्हणजेच कम्युनिस्ट पक्षाच्या म्हणजेच 'पॉलिटब्यूरो'च्या हातीं कायम रहाणें अत्यंत आवश्यक आहे. साम्यवाद प्रस्थापित करण्यासाठीं ही सत्ता कायम राखावी म्हणून मार्गातील अडथळे दूर करणें, आवश्यक साफसफाई करणें अपरिहार्य आहे. हा विरोधक-निःपात म्हणजे क्रांतिपूर्व काळांतील आणि सत्तेसाठीं केलेल्या लढ्यांतील शिल्लक राहिलेल्या व नव्या प्रयोगांत न बसूं शकणाऱ्या लोकांचा बंदोबस्त करण्याचा प्रयत्न होय. सोव्हिएट राजवट चोहोंकडून विरोधकांनीं घेरलेली असल्यामुळें तिला धोका निर्माण होणें सहज शक्य आहे. यासाठीं असा बंदोबस्त करणें आवश्यक ठरतें. ही उपपत्ति लोकप्रिय असून तिचें समर्थन करणारे अनेक आढळत. आरोपींचे कबुलीजबाब त्यांना विश्वसनीय वाटत नव्हते. परंतु "सामान्य जनते"साठी या खटल्यांची आवश्यकता आहे हें मात्र ते आग्रहानें सांगत. पक्षाला अत्यंत कडक शिस्त आणि संपूर्ण आज्ञाधारकता यांची गरज असल्यामुळें त्याचा अभाव असल्यास कठोर बनणेंच आवश्यक ठरतें. बौद्धिक मान्यता व ध्येयनिष्ठा यांच्या आधारें निर्माण होणारे संबंध, भीति व दडपशाहीवर आधारलेल्या संबंधांइतके निश्चित आणि स्थायी स्वरूपाचे नसल्यामुळें नेते देखील दुसऱ्या मार्गाचाच अवलंब करीत. या दृष्टिकोणामुळें वस्तुस्थिती-(Fact)पेक्षां सिद्धान्ता-(Theory)ला अधिक महत्त्व प्राप्त झालें आणि विशिष्ट सिद्धान्तांत वस्तुस्थिति बसविण्याची प्रवृत्ति निर्माण झाली. चांगलें जीवन निर्माण करण्याच्या साम्यवादांतील भविष्यविषयक आशेमुळें वर्तमानकाळांत होणाऱ्या वस्तुस्थितीच्या विपर्यासाकडे दुर्लक्ष होऊं लागलें.

या ' अधिकृत ' उपपत्तींत निःपाताच्या अतिरेकाकडे दुर्लक्ष केलें अथवा तो स्थानिक अधिकाऱ्यांच्या किंवा गुप्त-पोलिसांच्या अत्युत्साहाचा परिणाम होय असें म्हटलें जातें. तथापि या बाबतींत सिद्ध करण्यांत येणारे आरोप सगळीकडे विशिष्ट सांच्याचेच असत हें ध्यानांत घेतलें पाहिजे. या अतिरेकाच्या अनुषंगानें कांहीं भिन्न उपपत्ती पुढें मांडण्यांत येत. कारण त्यांच्यायोगानें प्रत्यक्ष झालेल्या अतिरेकाचें स्पष्टीकरण करणें सुलभ होई.

(२) **'फॅसिस्ट 'उपपत्ति :** ही निष्ठावंत कम्युनिस्टांच्याकडून अनेक वेळां सांगण्यांत येई. तिचें स्वरूप अगदीं साधें आहे: रशियन गुप्त-पोलिस-संघटनेंत आणि कम्युनिस्ट पक्षांत फॅसिस्टांनीं शिरकाव करून घेतला असून रशियन राजवट आंतून पोखरण्याचा ते प्रयत्न करीत आहेत. – या उपपत्तीमुळें सगळ्या अतिरेकी स्वरूपाच्या घटनांचा चटकन खुलासा करतां येई आणि त्यांची जबाबदारी शत्रूवर टाकली जाई. खुद्द येझॉव्हला अधिकारच्युतीनंतर वेडा किंवा प्रतिक्रान्तिकारक म्हणून संबोधण्यांत आलें आणि हें विश्वासार्ह वाटावें यासाठीं त्याच्या हाताखालच्या सर्व अधिकाऱ्यांची उचलबांगडी करण्यांत आली.

(३) **मजूरदल – उपपत्ति** ( The Labour-Force Theory ) : ही उपपत्ति देखील निष्ठावंत कम्युनिस्ट पुढें मांडीत आणि कैद्यांपैकीं अनेकजण तिचा पुरस्कार करीत. हजारों लोकांची अटक हा एक रशियांतील दूरदूरच्या आणि मागासलेल्या प्रदेशांचा औद्योगिक विकास करण्यासाठीं आवश्यक तेवढ्या कामगारांची भरती करण्याचें साधन होय. औद्योगिक विकास हें कार्य कठिण व अडचणीचें असल्यामुळें, भत्ता, बोनस, सुखसोयी इत्यादि आमिषें दाखवून देखील त्यासाठीं पुरेसे कामगार स्वखुषीनें तयार होत नाहींत. त्याकरितां आवश्यक त्याग करण्याची तयारी सोव्हिएट नागरिक दाखवीत नसल्यामुळें राज्याला वेळोंवेळीं कडक












उपाययोजना करणें जरुर होतें. आणि यामुळें वेळों-वेळीं अशा प्रकारें हजारों लोकांना अटक करावी लागते. श्वेतसमुद्र – कालवा, मॉस्को-व्होल्गा कालवा हे पुरे होत आल्यावर राज्यकर्त्यांनीं केलेली कैद्यांची सुटका व त्यांतील कांहींचा केलेला पुरस्कार राज्यकर्त्यांची कैद्यांच्या या त्यागाबद्दलची जाणीव व्यक्त करणारा आहे. कैद्यांच्या मध्यें ही उपपत्ति लोकप्रिय असण्याचें कारण तिच्या-योगानें त्यांना सोव्हिएटविषयक निष्ठा कायम राखून उपस्थित परिस्थितीशीं जुळवून घेतल्याचें समाधान होई हें होय.

तथापि अशा रीतीनें सक्तीनें भरती केलेल्या कामगारांची उत्पादनक्षमता इतरांच्या मानानें पुष्कळच कमी होती हा अनुभव अनेकांच्या सांगण्यांत येई. या उपपत्तींत दुसरीहि एक अडचण आहे. अगदीं सामान्य स्वरूपाचें असें हें काम करण्यासाठीं आधींच थोडे असलेले तंत्रविद्याकुशल कामगार वा एंजिनीयर यांचा राज्यानें सक्तीनें उपयोग कां करावा याचें या उप-पत्तीच्या आधारें समाधानकारक उत्तर मिळणें कठिण आहे.

(४) **आप्तवाक्य उपपत्ति** (The Book-of-Job Theory): विरोधक-निःपाततंत्राचा अवलंब करण्याचीं खरीं कारणें कैद्यांना किंवा त्यांची चौकशी करणाऱ्या अधिकाऱ्यांना माहीत नसतात; व माहीत असण्याचें कारणहि नसतें. केवळ वरिष्ठ अधिकारी व नेतेच तीं कारणें जाणतात. या नेत्यांवर विश्वास ठेवणें हेंच नागरिकांचें कर्तव्य होय. निःपाताचा मार्ग अवलंबिण्यास नेत्यांचीं तशींच कांहीं कारणें असलीं पाहिजेत आणि तीं न सांगण्यांतहि त्यांचा तसाच कांहीं हेतूहि असला पाहिजे. त्याविषयीं विचारपूस करणें हें सोव्हिएट नागरिकाला न शोभणारें वर्तन होय. त्याबद्दल शंका घेणें हा तर गुन्हाच म्हटला पाहिजे. हा निःपात म्हणजे नेते आपली घेत असलेली परीक्षाच होय आणि यांतून अखेरीस खरे निष्ठावंत सोव्हिएट नागरिकच बाहेर पडतील असेंहि या उपपत्तीच्या समर्थनार्थ म्हणण्यांत येई.

(५) **समाज-रोग-पूर्वप्रतिबंधक उपपत्ति** (The Theory of Social Prophylaxis): ही उपपत्ति गुप्तपोलिससंघटनेंत विशेष मान्यता पावलेली उपपत्ति होय. या उपपत्तीच्या आधारें कांहीं मूठभर वरिष्ठ पक्षाधिकाऱ्यांच्या मध्येंच निःपाताचें स्पष्टीकरण देण्यांत येत असावें असें वाटतें. रशियन राजवटीच्या आणि तिच्यांतील फौजदारी कायद्याच्या स्वरूपावर तिच्यामुळें प्रकाश पडतो.

भांडवलशाही जगांतील फौजदारी कायद्याचा संबंध केवळ गुन्ह्याशीं आहे. तथापि रशियासारख्या नवोदित, आंतून व बाहेरून शत्रूंनीं घेरलेल्या राज्यांत संभाव्य गुन्हे, कायदेभंग आणि गुन्हेगारी प्रवृत्ती यांचाहि बंदोबस्त होणें आवश्यक आहे. किंबहुना हेंच अधिक योग्य म्हटलें पाहिजे कारण गुन्हा घडल्यानंतर त्यासंबंधीं उपाययोजना करण्यापेक्षां तो टाळणें हेंच अधिक शहाणपणाचें होय. म्हणून संभाव्य हेर, प्रतिक्रान्तिवादी चळवळे, दहशतवादी या सर्वांचा राज्यानें वेळींच बंदोबस्त करणें जरुर आहे. जेथें जेथें गुन्हे करण्यास अनुकूल अशी वृत्ति (mood), मनःस्वभाव ( frame of mind ) अथवा प्रत्यक्ष तयारी असेल असे गट आधींच शोधून काढणें हें खरें सुव्यवस्थेचें कार्य होय. गुन्हा झाल्यावर 'गुन्हेगार' शोधून काढणें ही गौण बाब आहे. ही संभाव्य गुन्हेगारी निरनिराळया अवस्थेंत प्रस्थापित करण्यांत येई. त्याच-प्रमाणें राजकीय धोरणांत महत्त्वाचे फेरफार झाले म्हणजे साहजिकच संभाव्य गुन्हेगारी वाढणें व अनेकांना अटक होणें अपरिहार्य होई. जुन्या, निष्ठावंत बोल्शेव्हिक कार्य-कर्त्यांच्या वा नेत्यांच्या अटकेचा खुलासा देखील या उपपत्तींतून होऊं शकतो. त्यांच्या कबुलीजबाबामुळें या संभाव्य गुन्ह्याला वास्तविक ( real ) गुन्ह्याचें स्वरुप येई आणि त्यांच्या अटकेला कायदेशीरपणाचें स्वरुप प्राप्त होत असें. अशा प्रकारचा कायदेशीरपणा ( legalising ) निर्माण करण्याच्या तंत्रास रशियन व्यवहारांत महत्त्वाचें स्थान आहे. त्यामुळें अनेक बाब-तींत प्रथम काय करावयाचें हें ठरतें आणि नंतर त्यास कायदेशीरपणाचें स्वरूप कसें देतां येईल याचा विचार केला जातो. या तंत्राचें स्वरुप असें आहे. या तंत्रामुळें अटक केलेल्यांची चौकशी गुन्हा सिद्ध करण्याच्या हेतूनें होत नाहीं तर ती गुन्ह्याच्या संभाव्यतेविषयीं अधिक माहिती मिळवण्यासाठींच होते. आणि केलेली अटक समर्थनीय ठरावी यासाठीं आरोपींची कबुली अत्यावश्यक ठरते.

(६) **हिमकन्दुक उपपत्ति** (The Snowball Theory): निःपाताला सामूहिक (Mass) स्वरूप कां








प्राप्त झालें याचा खुलासा या उपपत्तीच्या आधारें अनेक वेळां केला जाई. मुळांत फारच थोड्या लोकांना अटक करण्याची कल्पना असावी. परंतु अटक झालेला प्रत्येक मनुष्य चौकशीच्या वेळीं इतरांचीं नांवें सांगत गेल्यामुळें निःपात होणाऱ्यांची संख्यावाढ होत असे. त्यामुळें सतत अधिकाधिक माणसें पकडलीं जाणें अपरिहार्य झालें. या उपपत्तींत मुळींच तथ्य नाहीं, असें नाहीं. तथापि तिच्यांतील स्पष्टीकरण बऱ्याच अंशीं वरवरचेंच आहे. दुसऱ्यांचीं नांवें सांगणें प्रत्येक कैद्याला भाग पाडलें जाई; तें कां याचा या उपपत्तींत कांहींच उलगडा होऊं शकत नाहीं.

(७) **योजना–प्रतियोजना उपपत्ति** (The Plan and Counter-Plan Theory): रशियांतील आर्थिक नियोजनाच्या तंत्राचें प्रतिबिंब निःपाताच्या कार्यांतहि उमटलें आहे. नियोजनांत प्रथम राष्ट्रीय पातळीवर इष्टांक ठरविले जातात आणि ते गांठण्यासाठीं काम करणें जरूर आहे हें प्रत्येक गांवांतील कामगारसंघटना, कारखाना, सामुदायिक शेत इत्यादींस कळविण्यांत येतें. त्याला प्रत्युत्तर म्हणून हे घटक 'ठरवून दिलेल्या कार्यापेक्षां आम्ही अधिक करून दाखवूं' असें अभिवचन देतात. हें अभिवचन स्वयंस्फूर्तीनें दिलें असल्याचा आभास निर्माण केला जातो. ह्या तंत्राचा प्रचाराच्या आणि प्रत्यक्ष कार्याच्या दृष्टीनेंहि अत्यंत उपयोग झाला असल्यामुळें, गुप्तपोलिससंघटनेनेंहि तें अंमलांत आणलें आहे. प्रथम किती विरोधकांना अटक करावयाची याबद्दलची योजना ठरवून ती खालच्या अधिकाऱ्यांना कळविण्यांत आली. त्यांनीं अपेक्षेपेक्षां अधिक विरोधक शोधून देण्याचें अभिवचन दिलें. उत्पादनक्षेत्राप्रमाणेंच याहि क्षेत्रांत स्पर्धेस आरंभ झाला; आणि या तंत्रामुळें अटक झालेल्यांची संख्या झपाट्यानें वाढली. तथापि हें स्पष्टीकरण वरवरचें असून त्याला फारसें महत्त्व देणें योग्य नव्हे. अटकेसंबंधीं अशा तऱ्हेच्या योजना असतील हें म्हणणें फारसें विश्वासार्ह वाटत नाहीं.

या नंतरच्या (८) **दुष्कर्मविपाक** (The Retribution Theory) आणि (९) **सूर्यावरील डाग** (The Sun-Spot Theory): या दोन्हीहि **उपपत्ति** चर्चेच्या दृष्टीनें मुळींच महत्त्वाच्या नाहींत. तथापि त्यावरून सोव्हिएट नागरिक राज्याच्या हेतूविषयीं संशय घेण्यापूर्वीं कोणत्या मर्यादेपर्यंत जाऊं शकतो हें स्पष्ट होतें. 'आपल्याच पापाचें फलित म्हणजे आपली अटक होय; कृतकर्माची जाणीव करून देण्याचाच तिचा हेतु आहे; प्रत्यक्ष त्या कर्मांशीं अटकेच्या कारणांचा संबंध नसेल पण त्यामुळें विशेष अडचण निर्माण होत नाहीं' असें सांगणारे कैदी आढळत. उलट, एका कैद्यानें यॅझॉव्ह यांच्या प्रमुखत्वाखालीं घडलेल्या घटना सूर्यावरील डाग वाढल्यामुळें घडल्या असेंहि प्रतिपादन केलें. हा कैदी आंतरराष्ट्रीय नास्तिकसंघाचा माजी अध्यक्ष होता.

(१०) **निर्वासित-यहुदी उपपत्ति** (The Theory of the Jews in the Wilderness): इस्रायलच्या प्रजाजनांना इजिप्तच्या गुलामगिरींतून मोझेसनें मुक्त केल्यानंतर आपल्या पुण्यभूमीचें दर्शन होण्यापूर्वीं चाळीस वर्षें इतस्ततः भटकावें लागल्याची कथा बायबलमध्यें आहे. या काळांत दास्यावस्थेंत कां होईना पण परत इजिप्तला जातां यावें म्हणून त्यांनीं बंडाळीं केल्याचीं वर्णनें बायबलमध्यें सांपडतात. 'चाळीस वर्षें जावीं लागलीं, एक सबंध पिढी नष्ट झाली, इजिप्तची स्मृतीदेखील शिल्लक राहिली नाहीं तेव्हां त्यांना पुण्यभूमि (Promised Land) दृष्टीस पडली' अशी कथा कैदी सांगत. युद्धपूर्व रशिया हा इजिप्त; समाजवाद, वर्गविहीन समाजरचना ही पुण्यभूमि; तिचें दर्शन व्हावें यासाठीं एक पिढी नष्ट होणें आवश्यक आहे हें या कथेचें तात्पर्य होय. तथापि अशा प्रकारें जुन्या क्रांतिपूर्व जीवनाची स्मृति असणारांचा पद्धतशीरपणें हेतुपुरःसर निःपात करण्याचा प्रयत्न झाला असेलसें वाटत नाहीं.

(११) **'चाबूक लगावणारा मुलगा' उपपत्ति** (The Whipping Boy Theory): ही उपपत्ति एका धर्मगुरूनें सांगितली. 'जोन्हा याला समुद्रांत फेकण्याचें कारण तो इतरांपेक्षां अधिक दोषी होता हें नव्हे, तर त्याच्या नशिबीं ती शिक्षा आली हें होय' ह्या कथेचें त्याला स्मरण झालें. ह्या उपपत्तींत बरेंच तथ्य आहे. परंतु निःपाताच्या सामूहिक स्वरूपाचें स्पष्टीकरण तिच्यामुळें होऊं शकत नाहीं. १९३३ च्या दुष्काळानंतर लोकांचा वाढत असलेला असंतोष शमविण्यासाठीं अनेकांचा बळी देणें आवश्यक झालें. त्या असंतोषाला










कारणीभूत झालेलें, शेतीला सामुदायिक स्वरूप देतांनाचें अतिरेकी वर्तन हें फॅसिस्ट आणि ट्रॉट्स्कीच्या अनुयायांमुळें घडलें असा खुलासा करण्यांत आला. हेंच सिद्ध करण्यासाठीं या निःपाततंत्राची उभारणीहि झाली. तथापि परराष्ट्रांशीं संबंध आलेले अन्य नागरिक, पूर्वीचे जमीनदार आणि अशाच कांहीं गटांतील लोकांना अटक कां व्हावी याचा खुलासा या उपपत्तींतून मिळूं शकत नाहीं.

(१२) **पक्षांतर्गत कलह** ( The Party Struggle Theory ): ही उपपत्ति ट्रॉट्स्की, बुखारिन् इत्यादींचे अनुयायी व जुने मेन्शेविक हे प्रामुख्यानें सांगत. लेनिनच्या मृत्यूनंतर पक्षांतील लोकशाही नष्ट करून स्टॅलिननें पक्षनेतृत्व आपणाकडे घेतलें. अनेक कारस्थानें करून आणि महत्त्वाच्या स्थानावर आपले स्नेही व नातेवाईक यांची वर्णी लावून राज्यसत्ताहि त्यानें कबजांत आणली. पक्षाच्या अंतर्गत जीवनांत गुप्त पोलिसांचा शिरकाव झाला. आणि कोणत्याहि तात्त्विक अधिष्ठानाऐवजीं आपली व आपल्या गटाची सत्ता कायम राखणें हेंच स्टॅलिनच्या राजकारणाचें सूत्र बनलें. इतकें करूनहि सामान्य जनता त्याला आपल्या बाजूस वळवितां आली नाहीं. वाढत्या असंतोषामुळें आपलें स्थान स्थिर करण्यासाठीं सोव्हिएट पद्धति केवळ नाममात्र बनवून तिच्या नांवाखालीं फॅसिस्ट हुकूमशाही निर्माण करणें त्याला आवश्यक झालें. यासाठीं कम्युनिस्ट पक्षच नष्ट करणें जरूर होतें. पण त्याचा परिणाम विपरीत झाला असता. म्हणून पक्षांतील जुनीं माणसें नाहींशी करण्याच्या धोरणाचा अवलंब करण्यांत आला. १९३४ सालीं देखील पक्षाच्या मध्यवर्ती समितीनें बहुमतानें स्टॅलिनच्या राजीनाम्याची मागणी केली होती असें या उपपत्तीस आधार म्हणून सांगण्यांत येई. अनेक लहान-सहान तपशिलाच्या बाबतींत ही उपपत्ति खरी वाटते. तिच्या समर्थनार्थ पुढें आणण्यांत येणारा सगळाच पुरावा तपासणें शक्य नसलें तरी त्यांत बरेंच तथ्य असावें असें म्हणण्यास हरकत नाहीं. तथापि तिचा मुख्य दोष म्हणजे स्टॅलिनच्या व्यक्तिमत्त्वाला तिच्यांत देण्यांत येणारें अवास्तव महत्त्व हा होय. स्टॅलिन कितीहि कारस्थानी व चलाख होता असें म्हटलें तरी अनुकूल सामाजिक शक्तींच्या अभावीं त्याला सर्वांना ' बनवून ' सत्ता काबीज करतां आली असती हें म्हणणें फारसें योग्य नव्हे. म्हणून या उपपत्तींत तथ्य असलें तरी तिला आहे यापेक्षां अधिक व्यापक स्वरूप देणें जरूर वाटतें. त्यावांचून सामाजिक शक्तींचा योग्य बोध होऊं शकणार नाहीं.

( १३ ) **बोनापार्टी उपपत्ति** ( The Bonapartist Theory ): " पक्षांतर्गत कलह " उपपत्तीचेंच हें एक वेगळें स्वरूप होय. नेपोलियनप्रमाणेंच रशियांत स्टॅलिन हाहि परकीय होता. त्याच्या वैयक्तिक महत्त्वाकांक्षा, स्तुतिप्रियता, राष्ट्रीयत्व व देशाभिमान यांना उत्तेजन देण्याची प्रवृत्ति इत्यादि वैशिष्ट्यांवर या उपपत्तींत भर देण्यांत येई. त्याला अखेरीस 'राजा' बनण्याची महत्वाकांक्षा होती असेंहि कोणी म्हणत.

( १४ ) **हुकूमशहाचा परपीडानंद उपपत्ति** ( The Caesarian Persecution – Mania Theory ): ही उपपत्ति कैदी अनेकवार हळूंच सांगत: " एकाच व्यक्तीच्या हातीं सत्तेचें अमर्याद केंद्रीकरण झालें आहे. स्टॅलिनला यामुळें सर्वांचाच सतत संशय येतो आणि या विकृतीचा फायदा घेऊन यॅझॉव्हनें सतत नवे नवे ' कट ' उघडकीस आणण्याचा उपक्रम सुरू केला आहे. त्यामुळें स्टॅलिन संतुष्ट होतो आणि यॅझॉव्हचें आसन पक्कें होतें." ही उपपत्ति सांगणारे स्टॅलिनच्या संरक्षणासाठीं केलेल्या तरतुदीकडे बोट दाखवीत. ह्या उपपत्तीमुळें प्रत्यक्ष परिस्थितीच्या एका बाजूचें स्पष्टीकरण होतें. तिच्यामुळें गुप्त-पोलिससंघटनेचें महत्त्व कां वाढलें याचा उलगडा होतो.

( १५ ) **नव अनियंत्रित-सत्तावाद** ( The Theory of Neo-Absolutism ): ही उपपत्ति अत्यंत विचारणीय असून एका इतिहासाच्या प्राध्यापकानें ती पुढें मांडली आहे. तिच्यांत प्राचीन व मध्ययुगीन साम्राज्यें आणि सोव्हिएट राजवट यांची तुलना करून कांहीं निश्चित अनुमानें काढलीं आहेत. या राजवटींचें वैशिष्ट्य उत्पादनसाधनांवरील राज्याची मालकी हें नसून राज्यकर्त्यांच्या हातीं सर्वव्यापी नियंत्रणामुळें केंद्रीभूत झालेली सत्ता हें होय. ही सत्ता विशिष्ट अधिकारस्थानामुळें त्यांना प्राप्त होते. अशा तऱ्हेच्या राजवटींत केंद्रीय सत्ता आणि अधिकारपरत्वें हुकमत गाजवणारे वर्ग यांच्यांत सातत्यानें कलह सुरू असतो. त्याचप्रमाणें अधिकाऱ्यांच्या निरनिराळ्या गटांतहि कलह असतात.











आणि या कलहांतूनच राज्याचें भवितव्य घडत असतें. एकीकडे मध्यवर्ती सत्ता आपल्या हातीं असलेलें अधिकार वाढविण्याचा प्रयत्न करते तर दुसरीकडे अधिकारी वर्गाची आपले अधिकार कायम राखण्याची आणि हातीं असलेल्या साधनसामग्रीवर – विशेषतः जमिनीवर – शक्य तर वंशपरंपरागत मालकीहक्क प्रस्थापित करण्याची धडपड सुरूं असते. निरनिराळ्या श्रेणींतील अधिकाऱ्यांतहि अशा प्रकारचे कलह सुरूं असतात. सामान्य जनता ही या वर्गकलहाचें केवळ साधन बनते. ती त्या कलहांत प्रत्यक्ष भाग घेत नाहीं. या परिस्थितीचें योग्य आकलन होण्यास सरंजामदारशाहींतील कलह ध्यानांत घेतले पाहिजेत.

सत्तेचें केंद्रीकरण करण्याच्या प्रयत्नांत स्टॅलिन-राजवटीलाहि विरोध होणें स्वभाविक होतें. हा विरोध प्रामुख्यानें पक्ष व राज्य यांतील वरिष्ठ अधिकाऱ्यांचाच होय. पक्षांतील वरिष्ठ अधिकाऱ्यांत अनेक जुने निष्ठावंत कार्यकर्ते होते. क्रांतीच्या आदर्शाशीं प्रत्यक्ष निर्माण झालेल्या परिस्थितीचा मेळ घालणें कठिण झाल्यामुळें त्यांना विरोधकांची भूमिका घ्यावी लागत असे. अशा तात्त्विक विरोधकांव्यतिरिक्त दुसराहि एक गट पक्षाधिकाऱ्यांत होताच. तो म्हणजे लायकी नसतांना जुन्या सेवेच्या आधारावर अधिकाराची व मोठेपणाची अपेक्षा धरणारांचा होय. तथापि या दोन्हीं गटांव्यतिरिक्त पक्षाचे इतरहि अनेक कार्यकर्ते अटक झालेल्यांच्यामध्यें होते.

सोव्हिएट राजवटींत एक नव्या प्रकारची सामाजिक विभागणी जन्मास आली. अन्य राष्ट्रांतील वरिष्ठकनिष्ठ भेदांऐवजीं, निरनिराळ्या श्रेणींतील अधिकाऱ्यांचे आपणांहून कनिष्ठ असणारांकडे तुच्छतेनें पहाणारे अनेक 'बंद' (closed) गट त्यांत आढळतात. आणि यांतील सर्वांत वरिष्ठ म्हणजे क्रेमलिनमध्यें गोळा झालेला स्टॅलिनभोंवतालचा गट हा होय. यामुळें खालच्या अधिकाऱ्यांनीं वरिष्ठांचा द्वेष करावयाचा ही एक सामान्य प्रवृत्ति बनली. उलट, सामान्य जनतेंत सर्वच अधिकाऱ्यांविरुद्ध असंतोष वाढूं लागला. जनतेच्या दृष्टीनें मानवी समानतेच्या तत्त्वाची सगळेच अधिकारी आपल्या प्रत्यक्ष वर्तनानें सतत पायमल्ली करीत होते. बहुसंख्य अधिकारी कामगारवर्गांतीलच असल्यामुळें त्यांतच आणखी भर पडली. क्रेमलिन-प्रमाणेंच प्रांतिक राजधान्यांच्या शहरांतहि ही गटबाजी निर्माण होऊं लागली. उदा०, युक्रेनमधील वृत्तपत्रांनीं युक्रेन कम्युनिस्टपक्षाचा सेक्रेटरी पॉस्टीशेव याचा 'युक्रेनमधील जनतेचा नेता' म्हणून गौरव करण्यास आरंभ केला. यांतूनच पुढें 'नेता' हें पद फक्त स्टालिनलाच लावण्यांत यावें असा दण्डक जन्मास आला.

या वरिष्ठ अधिकारी वर्गानें आपली सत्ता स्थिर-स्थावर व कायम करण्याचे प्रयत्न सुरूं केल्यामुळें त्याचा निःपात करणें आवश्यक झालें. लहान-सहान अधिकारी व असंतुष्ट जनता या दोहोंचीहि सहानुभूति आपल्या बाजूसच राहील अशी या बाबतींत स्टालिनची खात्री होती. १९३६ मधील आपल्या एका भाषणांत, राज्यकर्ते आणि सामान्य जनता यांचे संबंध निकटचे असणें आवश्यक आहे अशी स्टालिननें घोषणा केली. अनियंत्रित सत्तेचें सूत्र हेंच होय. तें पुढें मांडतांना, जमिनीवरून पाय उचलले गेल्यामुळें हतबल झालेल्या अँटियसच्या दंतकथेचा त्यानें उल्लेख केला आणि पक्ष – विशेषतः पक्षाचे पुढारी यांनीं जनतेशीं संबंध कधींहि तुटूं देतां कामा नये हें स्पष्ट केलें. 'स्टाकोनाव्हाइट' कामगार वा इतर सामान्य नागरिक यांच्या सत्काराचें तंत्र या जनतासंपर्काचीच एक बाजू होय.

येझॉव्हच्या नेतृत्वाखालील घटना म्हणजे पक्षांतील सामान्य वा खालच्या श्रेणींतील अधिकाऱ्यांचें वरिष्ठ अधिकाऱ्यांविरुद्ध झालेलें बंड होय. यांत स्टॅलिन आणि त्याच्या भोंवतालचा वरिष्ठ गट यांनीं आपली सत्ता कायम राखण्याच्या दृष्टीनें खालचे अधिकारी व सामान्य जनता यांची बाजू घेतली. ही उपपत्ति रशियांतील परिस्थितीचें यथार्थ आकलन होण्याच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाची आहे. केंद्रीय सत्ता आणि अधिकार स्थिर करण्यासाठीं उद्युक्त झालेले वरिष्ठ अधिकारी यांच्यांतील कलहांतून हा विरोधक-निःपात उद्भवला असें म्हणतां येईल. तिच्या समर्थनार्थ, युक्रेनमधील कांहीं घटना पुरावा म्हणून, पुढें मांडतां येतात. दहा मंत्र्यां-(Commissars)च्या हातीं केंद्रित झालेली तेथील सत्ता शंभर लहानलहान खात्यांत विभागण्यांत आली. युक्रेनमध्यें पुनः पॉस्टिशेवच्या तोडीचा पुढारी निर्माण झाला नाहीं.

तथापि या उपपत्तींत एक महत्त्वाची अडचण











शिल्लक रहाते. यॅझॉव्हच्या काळांत सोव्हिएट राज्ययंत्रणेंत कोणत्याहि प्रकारचा महत्त्वाचा फेरबदल झाला नाहीं. तत्पूर्वी निर्माण झालेली सत्ता, हक्क, नियंत्रण यांचें स्वरूप ठरवणारी पोलादी चौकट या काळांत कायम राहिली. बरेच वरिष्ठ अधिकारी या काळांत बळी पडले हें खरें! परंतु त्यांच्या जागा इतरांनीं घेतल्या. अधिकारपदावरील माणसें बदललीं पण अधिकारस्थानांत वा शासनसंस्थेंत बदल झाला नाहीं. त्यामुळें नव्यानें अधिकारपदावर आलेल्यांच्या मनांत पूर्वीच्या अधिकाऱ्यांच्या आकांक्षा निर्माण होणें अपरिहार्य होतें आणि जुना कलह नव्यानें सुरू होण्याची शक्यता कायम रहातें. प्रस्तुत उपपत्तींतील या अपुरेपणाच्या स्पष्टीकरणार्थ पुढील उपपत्ति ध्यानांत घेणें जरूर आहे.

**(१६) सामाजिक सत्ताधाऱ्यांचा पुरवठा** (The Theory of Social Supply): जेम्स बर्नहॅम् यांनीं सोव्हिएट समाजरचनेचें विश्लेषण करतांना 'मॅनेजर्स' हा नवा वर्ग तेथें उदयास आल्याचें नमूद केलें आहे. हा वर्ग रशिया, फॅसिस्ट राष्ट्रें, त्याचप्रमाणें नियोजित अर्थव्यवस्थेच्या दिशेनें पाउलें टाकणारीं युरोपीय राष्ट्रें येथें सर्वत्र वाढत आहे. उत्पादनसाधनें मालकीचीं नसतां विशिष्ट अधिकारस्थानामुळें त्यांजवर नियंत्रण करण्याची सत्ता हातीं असणें हें या वर्गाचें वैशिष्ट्य होय. आणि त्याच्या वर्चस्वामुळें 'नोकरशाही स्वरूपाची राज्ययंत्रणा' (Bureaucratic State) जन्मास आली आहे. या विश्लेषणांत एक महत्त्वाची दुरुस्ती आवश्यक आहे. 'मॅनेजर' शब्दानें व्यक्त होणारें तंत्रज्ञानविषयक कौशल्य आणि कार्यक्षमता गैरसमज निर्माण करतात. असें कौशल्य असणारांना रशियन शासनरचनेंत स्थान नव्हतें असें नाहीं. अनेक महत्त्वाच्या जागांवर अशीं माणसें आढळत. परंतु राजकीय दृष्टीनें त्यांचें महत्त्व दुय्यम प्रतीचेंच म्हटलें पाहिजे. त्यांच्या ऐवजीं राजकीय चळवळे व संघटनात्मक कार्यांत भाग घेणारे हेच वरिष्ठ अधिकारावर जात. यंत्रतंत्रविद्याविशारद आणि राजकारणकुशल या दोन बुद्धिजीवी गटांत दुसऱ्याचेंच महत्त्व अधिक होतें. राज्यांत वरिष्ठ स्थानीं मोठे तंत्रविज्ञानी किंवा इंजीनियर आढळत; तथापि ते तंत्रविद्येमुळें नव्हे तर पक्षस्थानामुळें. यामुळें रशियांतील सत्तारूढ वरिष्ठ वर्गाला 'मॅनेजर' ही संज्ञा कितपत लावतां येईल हा एक प्रश्नच आहे.

रशियन राजवटीचें तात्त्विक अधिष्ठान साम्यवाद हें मानलें जातें. तथापि राजवटींतील प्रत्यक्ष सत्तासंबंध हे नोकरशाहीवर अधिष्ठित असलेल्या पौर्वात्य झोटिंगशाहीसारखेच आहेत. नवें उत्पादनतंत्र, तदनुषंगानें आलेली तंत्रविद्या आणि सामान्य नागरिकांना विशिष्ट मार्गदर्शन करण्यासाठीं उपयोगांत आणली जाणारीं प्रचारसाधनें यामुळें त्यांत जो फरक झाला असेल तेवढाच! आणि राज्यसंस्था लयाला जाण्याची अपेक्षा धरणाऱ्या या राजवटींत राज्याला परमेश्वरी अंश मानलेल्या राजाचें स्थान प्राप्त झालें आहे!

प्रत्येक सत्ताधारी वर्ग आपलें स्थान सातत्यानें, वंशपरंपरागत कायम करण्याचा प्रयत्न करतो. नव्यानें प्राप्त झालेलीं तात्पुरतीं अधिकारस्थानें कायमचीं करण्याची तो धडपड करतो. शिक्षण, तंत्रविद्या, वशिलेबाजी इत्यादि साधनांनीं राज्यांतील महत्त्वाचीं अधिकारस्थानें विशिष्ट गटापुरतींच मर्यादित करण्याचे हे प्रयत्न एका परीनें रशियाच्या विकासाला सहायभूत झाले आहेत. पण त्यांना विरोध करणाऱ्या सामाजिक शक्तीहि त्यामुळें निर्माण झाल्या. छोटे अधिकारी आणि सामान्य जनता या त्या शक्ती होत. या विरोधामुळें निर्माण झालेला प्रश्न सोडवणें राज्याचीं सूत्रें हातीं असलेल्या मूठभर व्यक्तींना आवश्यक होतें; कारण सामान्य जनतेच्या आणि बहुसंख्य छोट्या अधिकाऱ्यांच्या वाढत्या असंतोषामुळें त्यांनाहि धोका होता. अशा परिस्थितींत छोटे अधिकारी व जनता यांची बाजू घेऊन बड्या सत्ताधारी अधिकाऱ्यांना नेस्तनाबूत करण्याचा मार्ग त्यांनीं स्वीकारला.

हा मार्ग म्हणजे एक अत्यंत महत्त्वाचा डावच होय. त्याच्या योगानें नोकरशाही स्वरूपाचें केंद्रीभूत राज्ययंत्र अबाधित राहिलें. अनेक लहानसहान अधिकाऱ्यांना बढतीची वाट पहाण्याऐवजीं, एकदम महत्त्वाचीं स्थानें व तदंगभूत सत्ता व सुखसोयी प्राप्त झाल्या. तथापि महत्त्वाच्या अधिकारपदावर असणारांची असुरक्षितता अतिशय वाढली. केव्हां कोणाला अटक होईल याचा नेम राहिला नाहीं. यामुळें सामान्य जनतेवरहि इष्ट परिणाम झाला व तसा तो होणें स्वाभाविक होतें. सर्व प्रकारची सत्ता व चैन उपभोगणारे अधिकारी आपल्या स्थानावरून केव्हांतरी खालीं ओढले जाण्याचा संभव कितीतरी वाढल्यामुळें त्यांची सत्ता व चैन ही सह्य झाली.







सर जेम्स फ्रेझर यांनीं जुन्या रोमन साम्राज्यांत अरिसीया येथील डियानाच्या मंदिरांतील एका महत्त्वाच्या चालीचा केलेला उल्लेख या बाबतींत उद्बोधक आहे. या मंदिरांतील पौरोहित्य सामान्यतः पळून आलेल्या गुलामांकडे असे; मात्र प्रत्येक नव्या पुरोहिताला जुन्याचा वध करूनच त्या स्थानीं येतां येई. अशा प्रकारें पुरोहित बनणारा फार तर कांहीं तासपर्यंतच त्या स्थानावर रहात असे. तथापि त्यामुळें तें स्थान घेण्यास उत्सुक असणारांची कधींहि वाण भासली नाहीं. रशियांतील नव्या पुरोहिताचें जुन्याला मारण्याचें कार्य गुप्त-पोलिससंघटनेनें आपणांकडे घेतलें. पण त्या स्थानावर येऊं इच्छिणारांना पत्रें, तक्रारी वा अन्य मार्गानें गुप्त-पोलिससंघटनेला कार्यप्रवण करण्याचें प्रयत्न करतां येतातच !

या दृष्टीनें या विरोधक-निःपाताचें कार्य भांडवलशाहींतील आर्थिक अरिष्टांच्या कार्यासारखेंच होय असें म्हणतां येईल. संपत्तीमुळें सत्ता उपभोगणारांची बऱ्याच प्रमाणांत या अरिष्टामुळें खांदेपालट होते, अर्थव्यवस्थेचा सांचा कायम रहातो व तिच्यांत निर्माण होणाऱ्या असंतोषाला वाट फुटून त्याची तीव्रता कमी होते. रशियांतील विरोधक-निःपाताच्या तंत्राशीं या अरिष्टांची तुलना करणें शक्य आहे. प्रस्थापित व्यवस्था कायम राखणें आणि अंतर्गत खांदेपालट करून असंतोष कमी करणें हें दोहोंचेंहि कार्य होय. या खांदेपालटीमुळें प्रस्थापित व्यवस्थेचें पुनरुज्जीवन होतें आणि तिच्यावर हुकमत गाजवणाऱ्या वरिष्ठांचें स्थान स्थिरावतें.

सामाजिक सत्ताधाऱ्यांचा पुरवठा सातत्यानें चालू ठेवण्याचें हें तंत्र रशियन राजवटीचें वैशिष्ट्य होय. या दृष्टीनें येझॉवच्या नेतृत्वाखालीं घडलेला विरोधक–निःपात हा अपवादात्मक म्हणतां येत नाहीं. अशा प्रकारची खांदेपालट भविष्यकाळांत कदाचित् अधिक शांततेनें, शिस्तीनें व पद्धतशीरपणें होईल. परंतु राजवटीचें नोकरशाही स्वरूप ध्यानांत घेतल्यास ती होणें अपरिहार्य आहे, यांत मात्र मुळींच शंका नाहीं. सत्ता कायम करण्यासाठीं धडपडणारे वरिष्ठ अधिकारी, त्यांचीं स्थानें घेण्याचा यत्न करणारे खालचे अधिकारी आणि दोहोंच्या कलहाचा फायदा घेऊन आपलें स्थान स्थिर ठेवूं पहाणारी वरिष्ठ सत्ता – या त्रिपक्ष झगड्याचा अखेरीस परिणाम काय होईल हें सांगणें कठिण आहे. युद्धाची संभाव्यता वाढल्यास पुनः १९३६–३९ सारखाच निःपाताचा प्रयत्न होणें असंभवनीय नाहीं.

**(१७) आशिया-वाद (The Asia Theory) :** ही उपपत्ति रशियांतील परकीय नागरिक आणि रशियाबाहेरील लोक यांच्यांत प्रामुख्यानें आढळते. तिच्यांतील मुख्य सूत्र म्हणजे रशिया हा आशियाचाच भाग आहे, रशियन जनतेला राजकीय स्वातंत्र्याचा मुळींच अनुभव नाहीं हें होय. बाह्य जगांतील कम्युनिझमचे पुरस्कर्तेदेखील पुष्कळ वेळां ही उपपत्ति सांगतात आणि रशियांतील हुकूमशाही हा कम्युनिझमचा दोष नसून रशियाचा दोष आहे असें प्रतिपादन करतात. इतरत्र लोकशाही स्वरूपाचा योग्य मार्गाचा अवलंब करणारा कम्युनिझम् प्रस्थापित होऊं शकतो, असें यावरून अनुमान काढलें जातें. उलट, रशियांत कांहीं झोटिंगशाहीबद्दल स्टॅलिनला जबाबदार धरतात आणि तो परकी म्हणजे जॉर्जिअन असल्यामुळें असें झालें असें स्पष्टीकरण देतात. तथापि या उपपत्तींत अनेक ऐतिहासिक घटनांचा विपर्यास होतो. झोटिंगशाही वा राज्याचें हडेलहप्पी किंवा अमानुष वर्तन हा आशियाखंडाचा विशेष होय असें मुळींच म्हणतां यावयाचें नाहीं. त्याचप्रमाणें रशियन जनता मागासलेली आहे हेंहि म्हणणें फारसें खरें नाहीं. स्वातंत्र्यलालसा झारच्या राजवटींत देखील आढळत असे. आणि सोव्हिएट राजवटीमुळें तिची तीव्रता वाढली असण्याचाहि संभव आहे.

विरोधक-निःपाताची प्रस्तुत ग्रंथांतील चर्चा येथें परिचयात्मक स्वरूपांत मांडली आहे. या चर्चेमुळें ग्रंथाला वैशिष्ट्यपूर्ण महत्त्व प्राप्त झालें आहे. रशियांतील वेळोंवेळीं घडणाऱ्या या घटनेचें एकादें विशिष्ट टोकळेबाज समर्थन मान्य करणें इष्ट नव्हे हें यावरून स्पष्ट होईल आणि त्याबरोबरच शासनसंस्थेंतील कोणत्या प्रवृत्तींचें लोकशाहीच्या दृष्टीनें जतन करावयाचें व कोणत्या टाळावयाच्या याबाबतहि मार्गदर्शन मिळूं शकेल. हुकूमशाहीशीं झगडण्यासाठीं तिचें स्वरूप समजलेंच पाहिजे असें नाहीं; पण तें योग्य रीतीनें आकलन झाल्यास अधिक परिणामकारक झगडा करतां येईल याविषयींहि दुमत होण्याचें कारण नाहीं. या सर्व दृष्टींनीं प्रस्तुत ग्रंथ त्यांतील वस्तुनिष्ठ दृष्टिकोणामुळें अत्यंत मोलाचा आहे असें वाटतें.

---

श्री. प्रभाकर पाध्ये

# मद्रासची सांस्कृतिक-स्वातंत्र्य-परिषद्

मद्रास येथें १२ सेप्टेंबर १९५३ रोजीं डॉक्टर सम्पूर्णानंद यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या सांस्कृतिक स्वातंत्र्य-परिषदेच्या द्वितीय अधिवेशनानें परिषदेवरील कांहीं सवंग टीकांना परस्पर उत्तर मिळून गेलें. मार्च १९५१ मध्यें मुंबईत भारतीय सांस्कृतिक-स्वातंत्र्य परिषद् भरली होती. तिला मोटमोठे पाश्चात्त्य प्रतिनिधि उपस्थित होते. ऑडेन, स्पेण्डर, मदारिआगा, नॉर्मन् टॉमस, जेम्स बर्नहॅम यांच्यासारखे जगद्विख्यात कवि, तत्त्वज्ञ आणि विचारवन्त त्या परिषदेला उपस्थित राहिल्यामुळें ती परिषद् खूप गाजली, पण त्याचबरोबर ही चळवळ पाश्चात्त्य-प्रेरित आहे, तिला भारतीय अधिष्ठान नाहीं, अशी समजूत थोडीबहुत पसरली. अशी समजूत प्रसृत होणें कांहींसें अपरिहार्य होतें. त्या परिषदेला वात्स्यायन, बुद्धदेव बोस, प्रा. गोकाक, प्रा. जहागिरदार, भारती साराभाई, राजा राव इत्यादि विख्यात भारतीय लेखक व अनेक विख्यात भारतीय विचारवन्त उपस्थित होते. पण ऑडेन, स्पेण्डर प्रभृतींच्या झगमगाटापुढें त्यांच्या कीर्तीचा प्रकाश थोडा फिका वाटावा हें साहजिक होतें. शिवाय, कोणत्याहि राष्ट्रांत एतद्देशीयांपेक्षां जगद्विख्यात परकीयांबद्दल अधिक कुतूहल असतेंच. परिषदेच्या चालकांनींहि बुद्धदेव बोसांसारख्या भारतीयांना जितकें महत्त्व द्यावयास हवें होतें तेवढें त्यावेळीं दिलें नाहीं, ही त्यांचीहि चूक झाली. त्या चुकीचें एक स्वाभाविक कारण ध्यानांत घेण्यासारखें आहे आणि आपल्या सांस्कृतिक जीवनाच्या वस्तुस्थितीवर तें भेदक प्रकाशहि टाकतें : सर्वसाधारण भारतीय बुद्धिजीवी व्यक्तीचा आज ऑडेन-स्पेण्डर प्रभृतींच्या वाङ्मयाशीं जितका परिचय असतो, आणि त्याचें जितकें महत्त्व तिला वाटतें, तितका परिचय आणि तितकें महत्त्व अन्यभाषिक भारतीय लेखकांच्या अगर विद्वानांच्या वांट्याला येत नाहीं.

### पूर्णतः भारतीय स्वरूप

मद्रासच्या परिषदेंत मात्र अशी कांहीं चूक होण्याचा संभवच उरला नाहीं. हिचें स्वरूप पूर्णतः भारतीय असलें पाहिजे असा चालकांचा प्रथमपासूनच कल होता. बाहेरून (सिलोन सोडल्यास) कोणाला निमंत्रण देऊन बोलावलेलेंच नव्हतें. एकच पाश्चात्त्य गृहस्थ उपस्थित होते, आणि त्यांनीं परिषदेच्या कार्यांत पाहुणे या नात्यानें थोडाबहुत भागहि घेतला. ते म्हणजे डॉ. हॅरी गिडिअन्स. न्यूयार्कच्या ब्रुकलीन कॉलेजचे हे प्रेसिडेण्ट अतिशय प्रभावी वक्ते आहेत – पण 'अमेरिकन कमिटी फॉर कल्चरल फ्रीडम्' या भ्रातृ-संस्थेचे एक सभासद या नात्यानें परिषदेच्या विधायक कार्यांत थोडाबहुत भाग घेण्यापलीकडे ते अधिक वावरले नाहींत. सिलोनी बांधवांनीं मात्र अधिक भाग घेतला. सिलोन डेली न्यूज्चे 'पार्लमेण्टरी एडिटर' मि. डि सिल्व्हा आणि सिलोनच्या पार्लमेण्टचे सभासद मि. जयवर्धन् यांनीं दर्शनीय भाग घेतला. पण ते अभारतीय आहेत असें कोणाला वाटलें नाहीं आणि वाटण्याचें कारणहि नव्हतें.

मार्च १९५१च्या परिषदेनंतर कित्येकांना असें वाटलें होतें कीं, हा दोन दिवसांचा उत्साह आहे आणि अर्थात् कालान्तरानें, उदबत्तीचा धूर हवेंत विरून जातो, त्याप्रमाणें तो विरून जाईल. कित्येकांनीं या प्रामाणिक वा बुद्धिपुरस्सर समजुतीनें या परिषदेची उपेक्षाहि केली. पण त्यांची एक मूलभूत चूक होत होती. ज्या कारणामुळें ही चळवळ अस्तित्वांत आली तीं कारणें आज अधिक विद्रूप स्वरूपांत अस्तित्वांत आहेत. सांस्कृतिक स्वातंत्र्याला असलेले धोके अधिक घातक








ठरत आहेत, त्यांच्या छाया अधिक गडद बनत आहेत आणि समाजाला असलेल्या ज्या सांस्कृतिक आणि राजकीय धोक्यांची ज्यांनीं चिंता केली पाहिजे ते अधिक बेफिकीर बनल्याचें दृश्य दिसत आहे.

तें कांहींहि असो, अनेक सुबुद्ध व्यक्तींना या धोक्यांची जाणीव आहे हें मद्रासच्या परिषदेनें सिद्ध केलें. कलकत्ता, पाटणा, मुंबई, पुणें, नागपूर अशा दूरदूरच्या ठिकाणांहून प्रतिनिधि आले होते. त्यांत प्रा. अमलेन दत्त, नीरदेंदु दत्त-मुजुमदार, रोहित दवे ('जनता' साप्ताहिकाचे संपादक), पी. वाय्. देशपांडे, प्रा. अरविंद मंगरूळकर, प्रा. गंगाधर गाडगीळ, रामवृक्ष बेनीपुरी (विख्यात हिंदी लेखक), ए. एन्. कृष्णराव (प्रख्यात कन्नड लेखक), फिलिप स्प्रॅट इत्यादींची प्रामुख्यानें गणना होत होती. खुद्द मद्रास-मध्यें, संगीतकलानिधि न्यायमूर्ति टी. एन्. वेंकटराम अय्यर, संगीतकलानिधि टी. व्ही. सुब्बराव, प्रा. आर. श्रीनिवासन्, प्रा. पी. साम्बमूर्ति (चौघेहि कर्नाटक संगीताचे अधिकारी), के. चन्द्रशेखरन्, विख्यात विद्वान् रामस्वामीशास्त्री, तामीळ लेखक की.रा., पिचुमूर्ति,योगियार, आर. व्ही., श्री आचार्य, कोठमंगलम् सुब्बु, भक्तवत्सलम्, मेयर चेंगलवारोयन, अर्थमंत्री सी. सुब्रह्मण्यम्, माजी अर्थमंत्री गोपाल रेड्डी, आंध्राचे उपप्रमुख मंत्री संजीव रेड्डी, प्रिन्सिपॉल माथिआस, 'हिन्दू'चे कार्यकारी संपादक एन्. रघुनाथन्, मद्रास विद्यापीठाच्या राजनीतिशास्त्रशाखेचे प्रमुख आर. भास्करन् इत्यादींनीं परिषदेच्या कार्यांत आत्मीयतेनें भाग घेतला होता. राजा अन्नमलाईहॉल सारख्या भव्य ऐश्वर्यपूर्ण हॉलमध्यें ही परिषद् भरली होती आणि दोन्हीं जाहीर अधिवेशनांना चिक्कार गर्दी झाली होती. उपस्थित मंडळींत कित्येक मंत्री, न्यायमूर्ति, प्रमुख वकील, डॉक्टर वगैरे मंडळी होती. तेव्हां मूठभरांचा अत्युत्साही कारभार असें या परिषदेचें वर्णन करणें सर्वस्वीं अशक्य होतें.

## धोक्यांची तीव्र जाणीव

परिषदेला फक्त कम्युनिस्ट धोक्याचाच तीव्रतेनें बोध होतो अशीहि एक टीका ऐकूं येते. नव्हे खुद्द वार्षिक सभेंत ती ऐकूं आली. या टीकेंत थोडेंसें तथ्य आहे. परिषदेच्या चालकांना सांस्कृतिक स्वातंत्र्याला असलेल्या लाल धोक्याची काळजी विशेष वाटते हें खरें आहे. याचा अर्थ इतर धोक्यांची त्यांना जाणीव नाहीं असें नव्हे. १९५१ च्या परिषदेंत 'सांस्कृतिक स्वातंत्र्याला असलेले धोके' या विषयावर परिसंवाद झाला होता. त्याचा अहवाल वाचला तर जातीयता, भाषिक अत्युत्साह, उग्र राष्ट्रवाद इत्यादि धोक्यांचा पूर्ण विचार झाला होता असें दिसून येईल. कित्येकांच्या मतें, हे इतर धोके अधिक भयानक आहेत. तरीपण कम्युनिस्ट धोक्याची चिन्ता परिषदेच्या चालकांना विशेष वाटत असलेली दिसून येत असेल तर त्याचें कारण, थोरामोठ्यांकडून, जबाबदार व्यक्तींकडून, राष्ट्राच्या संरक्षणाचीं सूत्रें ज्यांच्या हातांत आहेत अशांच्या कडून या धोक्याची भावित-अभावित उपेक्षा होत असल्याचें स्पष्ट दिसून येतें हें आहे.

पाश्चात्य-प्रेरित आणि पाश्चात्य-प्रणीत विचारसरणीच्या मूठभर प्रवक्त्यांचा हव्यास असेंहि या परिषदेचें वर्णन याउपर करणें अशक्य आहे. परिषदेचे उद्घाटक श्री. राजगोपालाचारी आणि अध्यक्ष डॉ. सम्पूर्णानन्द या उभयतांच्या भाषणांनीं या परिषदेच्या कार्याचा धागा भारतीय तत्त्वज्ञान आणि भारतीय परम्परा यांच्याशीं बेमालूम रीतीनें जोडून दिला.

श्री. राजगोपालाचारी यांनीं भारतीय संस्कृतीचें रहस्य 'आत्मसंयमन' या एका शब्दांत सामावलेलें आहे असें सांगून, "हें आत्मसंयमन अमेरिकन स्वातंत्र्य आणि रशियन शासननियंत्रण या उभयतांपेक्षां अगदीं वेगळें आहे; हें आत्मसंयमन, मानवानें अनेक पिढ्यांच्या अनुभवानंतर सुखसमृद्धीसाठीं स्वतःवर आनन्दानें लादलेलें आहे; उलट, आधुनिक संस्कृति निसर्गनियंत्रणाच्या उत्साहांत मानवाचा आत्माच नियंत्रित करून बसली आहे; मानवाला जड पदार्थाप्रमाणें गणण्यांत येत असून, स्त्रीपुरुषांच्या मनावर ताबा चालविण्याच्या अत्यंत हिडीस पद्धतींत याचें पर्यवसान झालें आहे; या पद्धतीला सत्य अगर मानवी मूल्यें यांच्याबद्दल काडीमात्र आदर नाहीं; कम्युनिझम् आणि हिटलरिझम् यांच्यांत या पद्धतीचा अतिशय घृणास्पद आविष्कार आढळतो" असें श्री. राजाजी म्हणाले आणि त्यांनीं संस्कृतीच्या संरक्षणासाठीं आणि संवर्धनासाठीं भारतीय आत्मनियंत्रणाचा संदेश दिला.

राजाजींच्या अमेरिकन स्वातंत्र्याविषयींच्या कल्पना अन्यायकारक आहेत असें डॉ. गिडिअन्स यांनीं










सांगितलें. अमेरिकन स्वातंत्र्यकल्पना म्हणजे स्वैराचार नव्हे, उलट स्वातंत्र्याला नैतिक मूल्यांचें अधिष्ठान असलें पाहिजे अशीच अमेरिकन कल्पना आहे असें तें म्हणाले.

### आजच्या बौद्धिक जीवनांतील खरी उणीव

डॉ. सम्पूर्णानन्दांनीं भारतीय बौद्धिक जीवनांतील पोकळीचें अधिक शुद्ध आणि अधिक बुद्धिवादी विवरण केलें. विद्यमान भारतीय बुद्धिजीवी वर्गाच्या विकृतीचा शोध घेण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. आज बुद्धिजीवी लोकांचें जीवन विफलतेनें भरून गेल्यासारखें दिसतें यांचें कारण काय, असा मूलभूत प्रश्न त्यांनीं निर्माण केला. त्याचीं आर्थिक इत्यादि भौतिक कारणें आहेतच, पण खरें कारण या वर्गाच्या अश्रद्ध मनःस्थितींत शोधावें लागेल असें सम्पूर्णानंदांनीं सांगितलें. आज आपल्या बुद्धिजीवी वर्गाची कशावरच श्रद्धा नाहींशी झाली आहे आणि त्यामुळें जीवनावरचीच श्रद्धा उडाल्यासारखी दिसते. याचाच उद्रेक चिडखोर, टीकाखोर मनोवृत्तींत दिसतो.

याची पहिली जबाबदारी त्यांनीं विद्यापीठांच्या माथीं मारली. आपलीं विद्यापीठें ज्ञानकेंद्रें असतील पण तीं सांस्कृतिक केंद्रें आहेत काय ? म्हणजे एखादी नवीन जीवन-पद्धति, जीवनदृष्टि, संस्कृतीची नवधारा, असें कांहींतरी निर्माण करण्याची ईर्ष्या, आकांक्षा अगर प्रवृत्ति आपल्या विद्यापीठांच्या परिसरांत आढळणार नाहीं. दुसरें महत्त्वाचें कारण म्हणजे आपल्या राष्ट्राचें नेतृत्व. यावर सम्पूर्णानन्दांनीं अधिक भर दिला. हें नेतृत्वच अश्रद्ध बनलेलें आहे. त्याला कसली जीवनदृष्टि नाहीं. नवध्येयाच्या प्रभेनें त्याची बुद्धि आणि वृत्ति उजळलेली नाहीं. उदात्त जीवन-मूल्यांवरील श्रद्धेच्या प्रकाशानें त्याच्या कार्याचा मार्ग उजळलेला नाहीं. आपल्या नेतृत्वाचा हा बौद्धिक आणि आत्मिक पोकळपणा आपल्या घटनेंत स्पष्टपणें दिसून येतो. आपली घटना उत्कृष्ट आहे, कारण जगांतील सर्वोत्कृष्ट घटनांवर तिनें सढळ हात मारलेला आहे. पण एखाद्या विशिष्ट जीवनदृष्टीचा अगर ध्येयदृष्टीचा तिच्यांत आढळ होतो का याचा शोध घेतला तर भकास निराशाच पदरीं पडेल. कल्याणकारी राज्याचें धुकट ध्येय आपल्या राज्यकर्त्यांच्या मनांत आहे, पण सम्पूर्णानन्दांच्या समजुतीप्रमाणें तें पुरेसें उदात्त असूं शकत नाहीं, कारण तें स्वार्थाच्या जाणिवेनें रंगलेलें आहे.

सम्पूर्णानन्दांच्या दृष्टीनें या शोचनीय परिस्थितीचें आद्य कारण आपल्या नेतृत्वाच्या धर्मातीतत्वाच्या अतिरेकी आणि चुकीच्या कल्पनांत आहे. दुसरें म्हणजे या नेतृत्वाला भारतीय संस्कृति, भारतीय आत्मा आणि भारतीय परम्परा यांच्याबद्दल खरा जिव्हाळा वाटतच नाहीं. त्यामुळें सांस्कृतिक पुनरुज्जीवनाचे आणि प्रदर्शनाचे आपले प्रयत्न म्हणजे एक खोटा देखावा बनला आहे. डॉ. सम्पूर्णानन्दांना भारतीय जीवनदृष्टि आणि भारतीय मूल्यें ( – ज्यांचें दर्शन आपल्या उपनिषदादि ग्रंथांत, वेदान्तांत अगर गांधीवादांत होतें – ) यांचा पुनर्जन्म हाच आजच्या विकृतीवर अमोघ उपाय वाटतो.

हें बरोबर असो वा नसो, आजच्या बौद्धिक जीवनांतील खरी उणीव, आजच्या बुद्धिजीवी वर्गाच्या आत्मिक वैफल्याचें आद्य कारण यांवर अचूक बोट ठेवून सांस्कृतिक स्वातंत्र्यवादी लोकांना कार्याची आणि विचारांची एक नवी दिशा डॉ. सम्पूर्णानन्दांनीं दर्शविली आहे यांत शंका नाहीं. आपल्या बुद्धिजीवी वर्गाला कम्युनिझमबद्दल एक आत्मघातकी विकृत आकर्षण कां वाटायला लागलें आहे याचें एक अतिशय मर्मग्राही कारण सम्पूर्णानन्दांनीं दाखविलें आहे. सांस्कृतिक स्वातंत्र्यवाद्यांनीं आजच्या परिस्थितींत खरोखर काय केलें पाहिजे, म्हणजे कोणत्या दिशेनें आणि विचारानें कार्य केलें पाहिजे याचें अचूक दिग्दर्शन डॉ. सम्पूर्णानन्द यांनीं केलें.

परिषदेनें पास केलेले सर्व ठराव याच एका दृष्टीनें महत्त्वाचे आहेत असें मी म्हणूं शकत नाहीं. या ठरावांत कम्युनिस्टविरोधीच दृष्टि अधिक आहे, असेंहि टीकाकारांना म्हणणें शक्य आहे. पण या ठरावांत स्वातंत्र्याच्या मूल्यांची प्रखर जाणीव आहे — आणि त्याहिपेक्षां महत्त्वाची गोष्ट म्हणजे जो एक नवा साम्राज्यवाद आशियाला ग्रासून टाकूं पाहात आहे त्याची व्यवस्थित जाणीव त्यांत आहे. वेठबिगारीवरील संयुक्त राष्ट्रांच्या अहवालावरील ठराव पाहिला म्हणजे आधुनिक कम्युनिस्ट राष्ट्रांची भौतिक प्रगति कोणत्या हिडिस मार्गांनीं होत आहे याची कल्पना येते.









## परिषदेंतील कांहीं ठराव व चर्चा

परिषदेनें भूदान आणि आदिवासींचें सांस्कृतिक स्वातंत्र्य या संबंधीं जे दोन ठराव केले आहेत त्यांत मात्र एक नवी जाणीव आहे. भूदान-आन्दोलनानें जी एक नवी आत्मिक शक्ति जागृत केली आहे तिचा उल्लेख पहिल्या ठरावांत असून, दुसऱ्या ठरावांत आदिवासींनाहि त्यांची एक विशिष्ट आणि मूल्यवान् संस्कृति आहे याची जाणीव प्रगट करण्यांत आली आहे.

परिषदेचें आणखी एक कार्य (परिमित प्रसिद्धीनें) झालें त्याचें महत्त्व विशेष आहे. कारण त्या कार्यान्वयें परिषदेनें प्रत्यक्ष स्वरूपाचें असें थोडेंबहुत बौद्धिक कार्य केलें. हें कार्य म्हणजे परिसंवाद. 'प्रथम स्वातंत्र्यच कां ?', 'लेखकाची जबाबदारी', 'कम्युनिझम् आणि बुद्धिजीवी वर्ग' आणि 'संगीतांतील आधुनिक प्रवृत्ति' या चार विषयांवर परिसंवाद झाले आणि त्यांत कांहीं थोर अधिकारी अशा व्यक्तींनीं भाग घेतला होता. चार विद्वान् गृहस्थ एकत्र जमतात, त्यांतला एक विषयाचा उपन्यास करतो, आणि मग इतर त्या विषयाच्या एकेका अंगाचा विकास करीत जाऊन अखेरीस या सामुदायिक अभ्यासाचें परिपक्व फळ पदरांत पडतें असें या परिसंवादाचें स्वरूप असतें. मुंबईंत भरलेल्या परिषदेनें (१) सांस्कृतिक स्वातंत्र्याला धोके, (२) संस्कृतीचें अधिष्ठान, (३) स्वातंत्र्य आणि नियोजन आणि (४) कला आणि वाङ्मय यांची सद्यःस्थिति यांवर परिसंवाद घडविले होते. परिषदेच्या अहवालांतला त्यांचा वृत्तान्त वाचला म्हणजे हें केवढें महत्त्वपूर्ण कार्य होतें याची जाणीव होऊं शकेल.

### सांस्कृतिक स्वातंत्र्यसंस्था

परिषदेचें एकंदर स्वरूप पाहिलें म्हणजे एका मूलभूत प्रश्नाला उत्तर मिळूं शकतें. ही परिषद् सांस्कृतिक आहे कीं राजकीय आहे ? —असा एक प्रश्न वारंवार विचारला जातो. या प्रश्नांतच एक गैरसमज अन्तर्भूत आहे. ही संस्था केवळ सांस्कृतिक नाहीं, तर सांस्कृतिक-स्वातंत्र्यसंस्था आहे. विद्यमान जगांत, विशेषतः सोव्हिएट साम्राज्यशाहीचे नानाविध पाश जागोजागीं झपाट्यानें आवळले जात असतां, स्वातंत्र्याचा विचार संपूर्णतया अराजकीय दृष्टीनें करणें केवळ अशक्य आहे. पण परिषदेचें 'राजकारण' अगर त्याचा आविष्कार विशिष्ट प्रकारानें झाला पाहिजे. म्हणजे हें राजकारण बौद्धिक स्वरूपाचें असलें पाहिजे. त्याची दृष्टि व्यापक असली पाहिजे. आणि मूलभूत प्रश्नांचाच विचार त्यानें केला पाहिजे. पण याहून महत्त्वाची गोष्ट म्हणजे या 'राजकारणा'च्या मुळाशीं जी तात्त्विक आणि सांस्कृतिक दृष्टि आहे तिचा वेध परिषदेनें अधिक घेतला पाहिजे. मद्रासची परिषद् या दृष्टीनें उपकारक होईल अशी मला आशा वाटते.

---

## पुस्तकांच्या दुकानांत

स्टॉकहोममधील एका पुस्तकविक्रेत्यानें आपल्या पुस्तक-दुकानांत एक नवीन टूम सुरू केली आहे: दुकानाच्या प्रवेशद्वाराजवळच एका मोठ्या टांचणीवरांत टांचण्या लावून लहानलहान अशीं पांढरीं व लाल निशाणें त्यानें ठेवलीं आहेत. त्यांतील एक निशाण आपल्या कोटावर लावून गिऱ्हाइकानें पुढें दुकानांत जावयाचें. पांढऱ्या निशाणावर लिहिलेलें आहे: "मी नुसता पुस्तकांतून 'चरणार' आहे.;" तांबड्या निशाणावर लिहिलेलें आहे: "मी घाईत आहे. मला चटकन् पुस्तक दाखवा" —— इंग्लंडमधील 'मॅंचेस्टर गॉर्डिअन'नें या छानदार कल्पनेचें स्वागत केलें असून त्यांत अशी भर सुचविली आहे कीं, कांहीं काळीं निशाणें पुस्तकें लांबविणाऱ्या 'उचल्यां'करितां ठेवावींत आणि करड्या रंगांचीं निशाणें घाणेरड्या बोटांच्या मुलांकरितां म्हणून ठेवून द्यावींत.








## पुस्तक-परामर्श

### कमळवेल–

( प्रा. वि. म. कुलकर्णी, यांचा कवितासंग्रह, चित्रशाळा प्रकाशन, पुणें; प्रस्तावना प्रा. **द. रा. बेंद्रे,** पृष्ठसंख्या ८०, किंमत दीड रुपया. )

गेल्या दहापंधरा वर्षांतील मराठी वाङ्मयांत कांहीं नवीनच विस्तार आणि धग उत्पन्न झाली आणि जेव्हां ह्या नवीनपणाचा पहिलाच चटका बसला तेव्हां रसिकांना भांबावल्यासारखें झालें. सुरुवातीला आमच्या सौंदर्यशोधक दृष्टीला विफलतेच्या निष्ठुर व नागव्या प्रदर्शनांत ओंगळपणाशिवाय कांहीं आढळेना व क्रांतीच्या अफाट गर्जनांतहि आम्हांस काव्यात्मकता दिसेना. पण आतां तो नवलाईचा क्षण गेला आहे. आपल्यासमोर प्रगट झालेल्या काळ्यापांढऱ्या आकारांतच आतां काव्याचीं रंगीबेरंगीं रूपें दिसण्याइतका नव्याचा परिचय आतां आपल्याला झाला आहे. साहजिकच नवसाहित्यामध्यें दिशाशून्य विफलता आणि गगनस्पर्शी आशावाद या दोन टोकांना जोडणारें जें मध्यंतर आहे त्याकडेहि आतां रसिकांचें लक्ष जात आहे. या मध्यंतराला नटविणाऱ्या काव्यसंपदेकडे आपण आस्थेनें पाहूं लागलों आहोंत, ही चांगली गोष्ट आहे. नवसाहित्याचा सर्वांगीण परिचय असा वाढत जाणें हें त्याच्या पुऱ्या आकलनासाठीं व रसास्वादासाठीं आवश्यकच आहे.

या मध्यंतरांतील काव्यसंपदेंत भर टाकणाऱ्या कवींमध्यें प्रा. वि. म. कुलकर्णी ह्यांना मोठें स्थान आहे, हें त्यांच्या आधींच्या काव्यरचनेवरून कळून आलें होतेंच. प्रस्तुत ' कमळवेल 'मधील कवितांमुळें त्यांच्याविषयींच्या अपेक्षा पुऱ्या होतात व नव्या अपेक्षांची उत्सुकताहि निर्माण होते. त्यांच्या कवितेंत मुळींच नटवेपणा नाहीं. उलट साधेपणा व त्यामुळें आलेली " निळयाशा पाण्यांत सदैव न्हाणाऱ्या कमळवेलीची पोपटी कांति " आहे. म्हणूनच त्यांची कविता वाचली कीं आजच्या जीवनाविषयीं भकास वाटत नाहीं आणि आशाळभूतपणाहि वाटत नाहीं. ' जीवनसखे ' सारख्या त्यांच्या कांहीं कवितांमध्यें कोठल्यातरी सूत्रधाराच्या या विश्वनाटकांत ' बाहुलें ' होण्याची असहाय मूर्च्छा आढळते; पण हे क्षण क्वचितच आढळतात. त्यांच्या कवितेचा प्रधानराग जीवनानुरागाचा आहे. मोठ्या तन्मयतेनें आणि हळुवार बोटांनीं कवीनें आपल्या हृद्वीणेवर ह्या रागाचे आलाप छेडले आहेत.

' लमाणांचा तांडा ' ही त्यांची सुंदर कविता त्यांच्या ' पहांटवारा ' या आधींच्या संग्रहांत ज्यांनीं वाचली असेल त्यांना या कवीच्या प्रतिभेची साक्ष पटलेली असेलच. तशाच कांहीं सुंदर कविता या संग्रहांतहि आहेत. ' सम्पला सिनेमा ', ' अर्घ्य ', ' दोरीवरचें पातळ' या कविता मला स्वतःला आवडल्या. चिमुकल्या चौथऱ्यावर एखाद्या कल्पनेचें सगुण ध्यान उभें करून तें रसिकांच्या भेटीला आणण्याची शक्ति त्यांच्या या व अशा अनेक कवितांमधून मला आढळून आली. ' कडुनिंबाच्या झाडामागून, हात गळयांतून ' घालणारा चन्द्र आपल्या मनांत शैशवापासून प्रौढत्वापर्यंतच्या आयुष्यांतील किती संवेदनांना हेलावून जातो ! आणि जीवनाला त्यांनीं दिलेली ' मिठाच्या खड्या'ची उपमा तर फारच गंमतीची आहे. जीवनांतलें जें पौष्टिक वा निकस अन्न आणि गोडधोड व कडूतिखट जें असेल तें असो; पण त्यांत रुचितत्त्व म्हणून मिठाचाच मान आहे. पण ' कधीं कधीं ' या कवितेंत तें या रूपकाच्या पलीकडे जातात. जीवनांत रमतांना कधींकधीं एक अनामिक वैराग्य येतें आणि ' कधीं कधीं वाटे मला, जावें विठ्ठलाच्या गांवा ' असें वाटतें, असें सांगून तें म्हणतातः

> ' कधीं कधीं वाटे मला असं वाटूं नये मला
> आणि पाणी लागूं नये असं मिठाच्या खड्याला ! '

सभोंवार वेढणाऱ्या भरतीच्या लाटांकडे पहात इवल्याशा खडकावर बसलेल्या असहाय माणसांप्रमाणें आजचें व्यक्तिजीवनहि क्षणभंगुर झालें आहे याची केवढी दाहक जाणीव या ओळींत आहे ! पाण्याचा स्पर्शच होण्याचा अवकाश ! 'मिठाचा खडा' नाहींसा होईल या व्याकुळतेनें व भयानें कवीच्या ' पोपटी ' जीवनासक्तीला कसें ग्रासलें आहे पहा ! या कवीचें जर तुम्हाला मन हवें असेल तर ते या साध्या पण उत्कट रूपकांतून तुमच्या प्रत्यक्ष भेटीला सामोरें येत आहे, असें मला वाटतें. त्यांच्या या संग्रहाचें रसिकांकडून स्वागत होईल व एक वेगळयाच रूपरंगाची कविता अनुभविण्यास मिळाल्याबद्दल, त्याचप्रमाणें प्रा. बेंद्रे यांच्या एका मार्मिक प्रस्तावनेलेखाचा लाभ झाल्याबद्दल, माझ्याप्रमाणेंच सर्वांना कवीचे आभार मानावेसे वाटतील.

**—दि. के. बेडेकर**










Proceedings of the Poona Philosophy Union, ( 1944-52 ) – पृष्ठें १००. किंमत २रु.

' दि पूना फिलॉसफी युनिअन ' किंवा ' पुणें तत्त्वज्ञान संघ' हा १९४४ च्या फेब्रुवारीमध्यें स्थापन झाला. तेव्हांपासून गेल्या ८ वर्षांत या संघापुढें सुमारें पन्नास विषय भाषणनिबंधरूपानें चर्चिले गेले. त्यापैकीं ४२ निबंधांचे सारांश प्रस्तुत पुस्तिकेंत दिले आहेत.

पुणें तत्त्वज्ञान-संघाचे एक चिटणीस वाडिया कॉलेजचे प्रा. प्र. रा. दामले यांनीं या पुस्तिकेच्या आपल्या प्रास्ताविकांत म्हटल्याप्रमाणें, तत्त्वज्ञानाची जिज्ञासा व व्यासंग यांचें संवर्धन करणें व त्यायोगें तत्त्वज्ञानविषयक अभिरुचीचा लोकांत प्रसार करणें हें नम्र ध्येय तत्त्वज्ञानसंघापुढें असून, त्या ध्येयानुसार गेलीं ८ वर्षें संघ उत्साहपूर्वक कार्य करीत आला आहे. तत्त्वज्ञान म्हणजे कोणत्याहि शास्त्रशुद्ध अभ्यासांतील वा अनुभवक्षेत्रांतील मूलगामी विचारांचें विवेचन हा व्यापक अर्थ तत्त्वज्ञानसंघाला अभिप्रेत असल्यामुळें, अत्यंत विविध प्रकारचे विषय संघापुढें चर्चिले जातात. प्रस्तुत पुस्तिकेंत अध्यात्मशास्त्र, सत्ताशास्त्र, नीतिशास्त्र, तर्कशास्त्र, मानसशास्त्र यांतील विषयांबरोबरच गणितशास्त्र, संख्याशास्त्र, साहित्यशास्त्र, भौतिकशास्त्र इत्यादि शास्त्रांतील अद्ययावत् विषयांवर वाचलेल्या निबंधांचे सारांश आलेले आहेत. मूळ वाचलेले निबंध समग्र प्रकाशित करणें अत्यंत खर्चाचें व मेहनतीचें काम आहे. प्रकाशनाभावीं ते निबंध नामशेष राहून शेवटीं विस्मृतींत गडप होतात. पुणें तत्त्वज्ञानसंघानें प्रस्तुत पुस्तिकेंत मध्यममार्ग स्वीकारून निबंधांचे त्रोटक सारांश प्रसिद्ध केले आहेत. हे सारांश त्रोटक असले तरी त्यांतून त्या त्या विषयांतील मुद्द्यांची सूत्ररूपानें मांडणी केली आहे. तीवरून त्या त्या विषयांची रूपरेषा अभ्यासकास स्पष्ट होण्यासारखी आहे. प्रा. ए. आर्. वाडिया यांनीं आपल्या प्रस्तावनेंत सुचविल्याप्रमाणें, आधुनिक तत्त्वज्ञानाच्या विविध क्षेत्रांत मूलगामी विचारांचा परिचय करून घेऊं इच्छिणाऱ्या आस्थेवाईक अभ्यासकांस ही पुस्तिका अत्यंत मोलाची व संग्राह्य वाटेल यांत शंका नाहीं.

—वि. म. वेडेकर

---

## पैसा

लेखकः सी. पं. खेर, बी. कॉम्.–प्रकाशकः महाराष्ट्र ग्रंथभांडार, कोल्हापूर ( १९५३ ). पृष्ठसंख्या २०७, मूल्य ४ रु. ८ आ.

अर्थशास्त्रावर मराठींत अलीकडे प्रसिद्ध होणाऱ्या पुस्तकांत अेक साजेशी स्वागतार्ह भर. पाठ्यपुस्तकांत किंवा परिचयात्मक पुस्तकांत स्वतंत्र विचारांची अपेक्षा सहसा कोणी ठेवीत नाहीं. आजवर अिंग्रजींत चर्चिला जात असणारा विषय नव्यानेंच मराठींत आणला जात असतांना तर स्वतंत्र विचारांची अपेक्षा करणें चुकीचेंच ठरेल. श्री. खेर यांनींहि आपलें पुस्तक स्वतंत्र नाहीं असेंच स्पष्टपणें सांगितलें आहे.

विवेचनांतील सुगमता, माहितीचा अचूकपणा व समर्पक पारिभाषिक शब्दांची निवड असे तीनच निकष अशा पुस्तकांना प्रामुख्येंकरून लावणें युक्त होईल. या तीनहि निकषांवर श्री. खेर यांचें पुस्तक चांगल्या प्रकारें उतरतें. अिंग्रजी पाठ्यपुस्तकांतूनहि सामान्यपणें डावलला जाणारा ' समाजसत्ताक व्यवस्थेंतील पैसा ' या विषयाचेंहि लेखकानें परिशिष्टांत ओझरतें दर्शन करून दिलें आहे. पुस्तकाचा अेकूण आटोप जिज्ञासु वाचकाला पेलेल असा आहे.

-- दे. अ. दाभोलकर



अनुक्रमणिका




